स्वा. वा. श्रीमंत आण्णासाहेब पटवर्धन बी. ए. कुरुंदवाडसंस्थानाधिपति (सीनियर) यांचे पुण्यस्मरणार्थ स्थापन झालेली.

भालचन्द्र-ग्रन्थमाला.

पुष्प १० वें.

---

# व्याही-विहिणी.



[ गद्यपद्यात्मक, कौटुंबिक दोन अंकी नाटिका



" माता भूमिः पुत्रोऽहं पृथिव्याः । " अथर्व वेद. १२ । १
" नमो मात्रे पृथिव्यै । नमो मात्रे पृथिव्यै ! " यजु. ९।२२



लेखकः—

गणेश कृष्णशास्त्री फाटक.



१९३२

प्रथमावृत्ति ] [ मूल्य ४ आणे.

प्रकाशक—विनायक आण्णाराव घैसास,
टिळकवाडी घ. नं. १९९ [६] पुणें.

श्री० गणेशशास्त्री फाटक यांची

## रंगभूमीवर आलेलीं

## नाटकें.

१ स्वर्गसाम्राज्य.
२ क्रांतिकौशल्य.
३ श्रीकृष्णदान.
४ बालगोपाल.
५ पंताची सून.
६ दिलदौलत.
७ नानांची माया.
८ माझी जमीन.
९ स्वर्गसुंदरी.
१० लडकी लक्ष्मी.
११ डेक्कन क्वीन.
१२ व्याही विहिणी.

---

## लवकरच रंगभूमीवर येणारीं

## नाटकें.

१ मत्स्येंद्रनाथ.
२ गाईचा आत्मा.
३ बभ्रुवाहन.
४ वरप्रदान.
५ चौकट राजा!
६ रक्ताचा घोट.
७ सिंहगर्जना.
८ दैवशालिनी.

मुद्रक—वासुदेव नारायण ठकार,
श्रीसिद्धेश्वर प्रेस, कोल्हापूर.

# समांतपूजन

व्याहीविहिणी ही नाटिका देशबंधु संगीत मंडळीनें सोलापुर येथें मेकॉनकी थिएटरांत, शनिवार ता. ६।८।३२ रोजीं ७ वाजतां प्रथम रंगभूमीवर आणली.

* * *

केवळ ' नांवा ' लाच असणारी ही नाटिका ' रूपा ' ला आणण्याचें सर्वस्वी श्रेय देशबंधु संगीत मंडळीचे मालक श्री. आण्णासाहेब व व्यवस्थापक बापूसाहेब या दोघां काळसेकर बंधूंनाच आहे. प्रेमळ, गोड आणि सूचक पत्रांचा वर्षाव करून त्यांनीं माझ्या–प्रतिभा कीं काय म्हणतात–तिला जागृत केलें आणि मग मी हातांत लेखणी घेऊन ही...पण आता अधिक कशाला ? मी या बद्दल त्यांचा अत्यंत आभारी आहे !

* * *

संगीतरत्न शंकरराव, श्री. आप्पासाहेब कुलकर्णी, जनुभाऊ निमकर, जोगळेकर, शहापुरकर, पंगे, पटवर्धन, आगाशे, द्विवेदी, रानडे, सप्रे वगैरे नटांनीं आपआपल्या भूमिका हौसेनें व अभ्यासानें नटविल्या, म्हणूनच इतकें दणदणीत यश या नाटिकेला लाभलें. याबद्दल सर्व नटवर्गास मी धन्यवाद देत आहें.

* * *

सिद्धेश्वर प्रेसचे मालक श्री. वासुदेव नारायण ठकार यांनीं तत्परता दाखविली नसती, तर इतक्या लवकर--ही संदर मुद्रणाची--नाटिका वाचकांच्या हातांत कधींच पडली नसती. याबद्दल त्यांचे व नेहमींप्रमाणें पुस्तकप्रकाशन केल्याबद्दल मित्रवर्य श्री. घैसास यांचे उपकार मानतों. इत्यलम् पल्लवितेन ।

सोलापुर,
६।७।३२.

रसिकांचा नम्र सेवक,
गणेश कृष्णशास्त्री फाटक.

# श्री. फाटक शास्त्री यांनीं लिहिलेल्या कादंबऱ्या
# विक्रीस तयार!



१ **वीरात्मा:**—भाग २, पृष्ठें ७००, ही चित्ताकर्षक कादंबरी वाचकांच्या हातांत पडल्यानंतर संपूर्ण वाचल्याशिवाय त्यांना जेवणही गोड लागणार नाहीं. सुंदर छपाई, विद्वानांचे उत्तम अभिप्राय. किं. ४ रु.

३ **अनाथांचा नाथ!**—ही राजकीय कादंबरी एकवार वाचण्यालायक आहे. भापा व संविधानक अतिशय मोहक. किं. १॥. रु.

३ **ढोंगी गुरूच्या सैतानी लीला!**—धर्माच्या नांवाखालीं संभावीत सोदे, बोकेसंन्याशी कशा लीला करतात, याचें अत्यंत मार्मिक चित्र. किं १॥. रु.

४ **जयजयकार!**—बौद्धकालीन शुद्धिकरणावर लिहिलेली अत्यंत बोधप्रद कादंबरी. किं. ६ आणे.

५ **चेटूक:**—उपदेशपर व तेजस्वी तीन गोष्टींचा संग्रह. किं. ६ आणे.

३ **देशाचे ज्ञानदीप:**—देशसेवक तरुणांना 'खेड्याकडे चला!' म्हणून संदेश सांगणारी, तडफदार कादंबरी. किं. ६ आणे.

७ **कुऱ्हाड:**—हिंदुधर्मावर घाव घालणाऱ्या 'कुऱ्हाडी' आम्हीच कशा निर्माण केल्या, याचें भेसूर, पण बोधकारक चित्र. किं. ६ आणे.

किंमतीशिवाय टपाल हंशील निराळें पडेल.

पत्ता:—स्वर्गसाम्राज्य पुस्तकालय-कुरुंदवाड.

# व्याही–विहिणी

## अंक १ ला.

### प्रवेश १ ला

**स्थळ**—गौरीहर गांवांतील प्रयागपंत महंकाळांचा बंगला; मीनाक्षीची खोली.

**पात्रें**:—मीनाक्षी पुस्तक वाचीत आहे; इतक्यांत वेष पालटलेला प्रभास हातांत बॅग व गाठोडें घेऊन प्रवेश करितो.

**मीनाक्षी**– कोण तुम्ही? कशाकरितां आलांत?

**प्रभास**– मी रावसाहेब बद्रीकेदार धनुष्कोटींच्याकडून आलों आहें.

**मीना०**– ( उठून ) काय? त्यांच्याकडून आलांत?

**प्रभा०**– होय. त्यांच्याकडून, आपल्या भावी श्वशुरांकडून आलों आहें. तुमचं लग्न ठरलं आहे, हें तुम्हाला माहीत आहेच!—

**मीना०**– हो, माझ्या सुदैवानं ती गोष्ट माझ्या कानावर आली आहे. नाहीं तर आमच्या हिंदुस्थानांत स्वतःच्या लग्नाची जाणीव नसलेली किती तरी चिमुकलीं बाहुलीं, न कळत लग्नपाशानं बांधलीं जातात!

**प्रभा०**– आपल्याकरितां रावसाहेब धनुष्कोटींनीं...

**मीना०**– प्रत्येक वेळीं त्यांना ‘ रावसाहेब ’ म्हणायला पाहिजेच का? आम्हांला माहीत आहे त्यांना सरकारदरबारांतून पदवी मिळालेली!

**प्रभा०**– म्हणजे आपल्या श्वशुरांचा हा गौरव झाला असं आपल्याला वाटत नाहीं?

**मीना०**—याबद्दल मत न देणंच बरं नव्हे का? बरं आतां तें राहूं द्या. प्रस्तुतमनुसराम:। तुम्ही कशाकरितां आला होतां?

**प्रभा०**— श्रीयुत धनुष्कोटींनीं आपल्याकरितां हे दागिने करविले आहेत आणि हे शालू घेतले आहेत. हे आपल्या अंगावर नीट बसतात का पाहा आणि यांतले आपल्याला कोणते आवडतात ते सांगा. ( देतो. )

**मीना०**— ( पाहात असतां स्वगत ) खात्रीनं हे तेच असावेत. एकंदर वेष बदलून स्वारीनं हें नाटकच केलं आहे म्हणायचं! पण आम्हा बायकांची दृष्टि किती सूक्ष्म आणि भेदक असते, याची पुरुषांना काय कल्पना? पण इकडं पाहून माझं हृदय कां बरं असं थरथर कांपूं लागलं? हृदया! असं भिऊं नकोस! चंदेरी बरसातीनं सागर उचंबळून येतो, उदयोन्मुख सूर्याच्या सुवर्णरसानं फुलांच्या गालावर टवटवी येते, मेघमालेची अनंताशीं भेट होतांच तिच्या हृदयांत जागती ज्योत चमकते आणि वेड्या, तूं मात्र प्रफुल्लितपणानं आनंदनृत्य करायचं सोडून असा भ्याडपणा पत्करलास?

**प्रभा०**— ( स्व. ) ही दागिने पाहाण्याचं मिष करते आहे, पण मला वाटतं, हिच्या अंतःकरणांत कांहीं निराळेच विचार चालले असावेत. चेहरा हा हृदयाचा आरसा आहे; चेहरा हा हृदयांतल्या गुप्त गोष्टी चव्हाट्यावर मांडणारा घरभेदी बिभीषण आहे; मग तो मला कांही सांगेल का?—

[ पद १लें; चालः—सुरस सुरसुधा० तालः— झपताल. ]

**॥ खचित नच मला, प्रियेहुनी प्रिय अमरबाला ॥ रमवीत प्रेमें मनाला ॥ ध्रु० ॥ मृदु अधरिं माधुरी, वसत जी सुखकरी, प्राप्त जरि हो प्यारी, तुच्छ मग स्वर्गरसप्याला ॥ १ ॥**

मीही आज रोमान्सच्या भरांत कांहीं तरी भलतंच करून बसलों आहे! याचा शेवट गोड झाला म्हणजे मिळविली!

**मीना०**—( स्व. ) छेः यांच्यासमोर असं एकांतीं बसणं मला कससंच वाटूं लागलं आहे! ( उ. ) मला या वस्तु दाखविण्यापेक्षां आण्णांना दाखविलेल्या बऱ्या नव्हे का?

**प्रभा०**—प्रयागपंत खालीं नाहींत. कुठं बाहेर गेले आहेत. ( स्व. ) ते नाहींत असं पाहूनच मी घरांत शिरलों आहे म्हणा!

**मीना०**—तर मग आईला बोलावून आणतें. ( जाऊं लागते. )

**प्रभा०**–प्लीज! दहा मिनिटं चंद्रभागाबाईंना बोलावूं नका!–आश्चर्य वाटूं देऊं नका–तसंच कांहीं महत्वाचं कारण आहे!

**मीना०**–बरं तर. सांगा काय तें कारण!

**प्रभा०**–( स्व. ) आतां कारण काय सांगूं? आपल्या भावी बायकोला पाहून गांगरणारा मी चांगलाच शूर ठरलों म्हणायचा! ( उ. ) बरं पण आपल्याला हे जिन्नस कसे काय आवडले?––आपल्या वडील मातोश्रींना नंतर दाखवितोंच. पण आपल्याला कसे काय आवडले. अगदीं खास त्यांनीं विचारलं आहे!

**मीना०**–त्यांनीं कुणी?

**प्रभा०**–त्यांनीं म्हणजे प्रभासपंतांनीं नव्हे; त्यांच्या वडिलांनीं.

**मीना०**–मी आतां खरं सांगूं? तुम्हाला राग नाहींना येणार?

**प्रभा०**–छे छे! राग येण्याचं काय कारण?

**मीना०**–हें पाहा, पूर्वीं आपल्या सुवर्णभूमींत सोन्याचा धूर निघत असे; पण सध्यां लांकडाचाही निघण्याची मारामार पडते आहे! नाहीं म्हटलं तर पिंवळ्या हत्तीचा मात्र भरपूर धूर निघतो आहे. अशा दरिद्री देशांत, आपल्याच देशबंधूंच्या हृदयांवर डागण्या देत, असले हिऱ्यामोत्यांचे अलंकार अंगावर लादून, जिवंत, चालत्या बोलत्या तिजोऱ्या बनण्यांत काय अर्थ आहे? त्यापेक्षां इतके पैसे व्याजीं लावले आणि त्या व्याजांतून गोरगरीबांच्या अडीअडचणी भागविल्या, तर तोच मनाच्या अंगावर, जडावापेक्षांही बहुमोलाचा अलंकार चढविल्यासारखं होणार नाहीं का? आमचा मुख्य अलंकार पति. तो सोन्याच्या गुणांचा असला आणि जगाच्या मुकुटांत कोहिनुराप्रमाणं चमकला, म्हणजे आम्हांला नुसत्या मणिमंगळसूत्रावरच नवरत्नांनीं सालंकृत झाल्यासारखं वाटतं!

**प्रभा०**–( स्व. ) हिला माझ्या घरच्या रत्नांनीं दिपवावं म्हटलं, पण उलट हिनंच मला आपल्या वाग्रत्नांनीं दिपविलं! आहाहा! किती सुंदर आणि उदात्त विचार हे! असली दिव्य मूर्ति माझ्या हृदयसिंहासनावर बसली आहे! देवीमुळं देऊळ पवित्र होतं; हिच्यामुळं मीही पवित्र झालों आहें! ( उ. ) बरं हे शालू तरी?

**मीना**०–(स्व.) मीही हळूहळू धीट होत चाललें आहे. मला वेषांतरानं फसवितात हं? देऊं का एक झणझणीतसं उत्तर? पण असे वाक्प्रहार करणं, म्हणजे स्वतःच्याच हृदयाला जखम करण्यासारखं नाहीं का? (उ.) दागिन्याबद्दलचं मत सांगितल्यानंतर पुनः शालूदुपेट्याबद्दल सांगायला पाहिजेच का? देशाला दारिद्र्य आणणाऱ्या या श्रीमंती भपक्यापेक्षां मी नेसलेलं हें पातळ कितीतरी साधेसुधेपणाच्या वैभवांत खुलून दिसतं आहे?

**प्रभा**०–हें तुम्ही स्त्रीस्वभावाविरुद्ध बोलत आहांत.

**मीना**०–स्त्रियांचे स्वभाव ठरलेले का आहेत? पुरुष अशा कल्पना तरी कां करतात? उदाहरणार्थः स्त्रियांना तुम्ही मार्दवाची मूर्ति आणि शृंगाराची देवता समजतां परंतु त्यांनींही पुरुषांनीं धडा घ्यावा अशीं वीरश्रीचीं कामं केलीं आहेत कीं, नाहींत? स्त्री–पुरुषांना स्वभाव आणि विकार यांची देणगी देतांना परमेश्वरानं मुळींच पक्षपात दाखविला नाहीं! बरं तें असो. पण तुमचं याहीपेक्षां आणखी काम असावंसं वाटतं!

**प्रभा**०–(स्व.) आतां मात्र माझं अंतःकरण होकायंत्राप्रमाणं थरथरत आहे! माझ्या पत्राचं अनुकूलच उत्तर येईल ना? (उ.) आतांपर्यंत राव-साहेबांची–नव्हे–श्रीयुत बद्रीकेदारांची कामगिरी झाली. आतां त्यांच्या चिरंजिवांची–प्रभासरावांची कामगिरी आपल्याला सादर करतों. त्यांनीं हें आपल्याला पत्र दिलं आहे! (देतो.)

**मीना**०–काय बरं लिहितात हे? (स्वागत वाचते.) ‘प्रिय मीनाक्षी!— आपण राष्ट्रीय विद्यापीठाच्या पदवीधर आहांत. मीही थोडीं बहुत चार अक्षरें शिकलों आहें. आपणा उभयतांच्या मात्यापित्यांनीं आपला दोघांचा विवाह ठरविला आहे. मला आपण पूर्णपणें पसंत आहांत. पण मी आपल्याला आहे का? आपल्या हातच्या चार अक्षरांनीं हें कळेल तर मला समाधान वाटेल. आपण विनयशील आहांत. आपल्या तीर्थरूपांच्या इच्छेला मान देण्याकरितां तरी आपण विवाहाला रुकार दिला नाहींत ना? तसें असेल तर आपल्या संतोषाकरितां, विदीर्ण हृदयानं हें लग्न रद्द करायला मी एका पायावर तयार आहें!—आपला, प्रभास.’ माझी उडालेली धांदल प्रत्यक्ष पाहाण्याकरितां स्वारीनं ही गंमत केलेली दिसते. आतां आपणही गंमत

करावी. (उ.) अशा वेळीं असं पत्र लिहिणं, म्हणजे स्वतः डोक्यावांचून आहोंत, असंच जगाला जाहीर करण्यासारखं नाहीं का?

**प्रभा०**—तें कसं काय? प्रभासांचा यांत काय व्यवहार चुकला?

**मीना०**—आठ दिवसांपूर्वी जर त्यांचं असं पत्र येतं, तर त्यांना मी पत्र लिहिलं असतं कीं, तुमच्यावर माझं मुळींच प्रेम नाहीं; केवळ अण्णांच्या इच्छेनं मी मरून पिशाचावस्थेंत तुमच्यापुढं उभी आहे; अशा मेलेल्या जिवाशीं लग्न करायचं असेल, तर खुशाल करा!

**प्रभा०**—काय प्रभासरावांच्यावर तुमचं प्रेम नाहीं?

**मीना०**—होय!–पण तुम्ही का असे घाबरे झालांत?–पण त्यांना आतां असं कसं पत्र लिहायचं? आज केळवण झालं; संध्याकाळीं अक्षत निघून सीमांतपूजन होणार; सारे पाहुणेपै जमले; गांवांत लग्नपत्रिकासुद्धां वाटल्या, अशा वेळीं हें लग्न कसं रद्द करायचं? त्यांना वेळेची किंमत कळत नाहीं, असंच म्हटलं–पाहिजे! आतां लग्न रहित झालं, तर गांवांत लौकिक कुणाचा होणार बरं?

**प्रभा०**—पण तुम्हाला ते पसंत आहेत, त्यांना तुम्ही पसंत आहांत, असं माझ्या कानावर आलं आहे!

**मीना०**—पण डोळे आणि कान यांत चार बोटांचं अंतर असतं, हें तुम्हाला माहीत असेलच!

**प्रभा०**—अरेरे! मग माझा सर्वांनीं गैरसमजच केला म्हणायचा! फुललेले गुलाब दिसावेत म्हणून आलों, तो जळजळीत इंगळ डोळ्यावर पडले! अमृताच्या आशेनं हातांत प्याला घेतला, पण त्यांत दाहक कालकूट आढळलं! शांति मिळावी म्हणून पूर्ण चंद्राच्या अभिलाषानं आकाशाकडं पाहिलं तो मस्तकावर वज्राघात झाला! (वेष टाकतो.) मीनाक्षी? पाहिलंस का या प्रभासाकडे? तुझ्या वडिलांच्या आणि मातोश्रींच्या सांगण्यांत तर तुझं माझ्यावर निस्सीम प्रेम आहे असं...पण जाऊं द्या! प्रत्यक्ष तूं नाकारीत असतांना त्यांची गोष्ट खरी मानणं म्हणजे ...मीनाक्षी! तूं सुखी ऐस! मी आत्तांच्या आत्तां आप्पाच्याकडे जाऊन हें लग्न मोडतों? (जाऊं लागतो; ती आडविते.)

**मीना०**—असं काय करायचं तें? मी आपल्याला आल्याबरोबरच ओळखलं होतं, म्हणून ही थोडीशी गंमत केली? असं भलतं सलतं करण्याकरितां मी आपल्याला मामजीच्याकडे मुळींच जाऊं देणार नाहीं!—

[ पद २२ें; चालः— छबी तोर सुंदर० तालः—केरवा. ]

**खरें याच पायीं नाथा, हृदय वाहिलें ॥ प्रिया, प्रेमजीवन माझें जगतिं जाहलें ॥ धृ० ॥ आतां मी मुळीं लव नुरलें ॥ सख्याच्या स्वरूपीं विरलें ॥ समाधीसुखासी भुललें ॥ मन मोहिलें ॥ खासें विभव मिळविलें ॥१॥**

**प्रभा०**— हें सारं खरं ना? का आपल्या मात्यापित्यांची अब्रू बचाविण्याकरितां...

**मीना०**—मी आतां बोलतच नाहीं. माझ्या हृदयाला आनंद देणारी ही माझी मैत्रीणच आपल्याला काय तें सारं सांगेल. हिचे शब्द कानांना ऐकूं येणार नाहींत; पण हृदयांत मात्र उमटतील! ( लॉकेट काढून देते. ) हिच्याशीं गुजगोष्टी झाल्यावर ही मला परत द्यायची बरं का? ( लॉकेट देत असतांना पोलक्यांतून एक कागद पडतो; तो प्रभास उचलतो; पण ते मीनाक्षीच्या लक्ष्यांत येत नाहीं. )

**प्रभा०**—काय? माझ्या फोटोचं लॉकेट तूं अष्टौप्रहर जवळ बाळगतेस? आहाहा! मीनाक्षी! एकंदरींत माझ्यावर तुझं प्रेम आहे तर!

**मीना०**—त्याशिवाय जवळ कोण लॉकेट बाळगील?

**प्रभा०**—बरं ही चिठी कसली आहे?

**मीना०**—आग बाई! ती कशी आपल्या हातांत आली? (खिसा चाचपते.) गळ्याची शपथ आहे! पाहायची नाहीं ती! हें काय बरं?

**प्रभा०**—तर मग आतां पाहाणारच! (पाहातो.) काय? माझ्यावरची ही सुंदर कविता तूंच केलीस? याचं नांव प्रतिभा! तूंच वाचून दाखीव पाहूं मोठ्यानं!

**मीना०**—पुनः वेषांतर तरी करावं! आई येईलना!

**प्रभा०**— नसली तुझी इच्छा तर मीच वाचतों. [ वाचूं लागतो. ] छेः याची चाल लागत नाहीं. सांग, चाल कशी ती सांग ना! पुरुषांची

बिघडलेली चाल बायकांनींच दुरुस्त केली पाहिजे ! सांग, गळ्याची शपथ.

**मीना०**— सांगतें—सांगतें ! शपथेवर नको कांहीं यायला ! अगदीं 'लाला रूख' चीच आवृत्ति झाली ! [चाल सांगते; उभयतां म्हणतात.]

॥ कविता ॥

**पूर्वजन्मीं पुण्य केलें मूर्ति म्हणुनी लाभली ॥ कंठि अर्पिन कधिं-प्रियाच्या मंगला माला भली ॥ १ ॥ नच कळे मी चंद्र बघुनी कदा गेलें मोहुनी ॥ पूर्णिमेची वाट पाहे सोत्सुका अजि होउनी ॥ २ ॥ रजनिकांता, प्रियकरा त्या हृदयकांता पाहुनी ॥ प्रीतिची चम् चम् करीते अंतरंगीं चांदणी ॥ ३ ॥ सिंधु तूं प्रभुही गुणांचा तव सरी कधिं ना मला ॥ स्थान जरि का मिळत चरणीं धन्य तरि ही प्रेमला ॥ ४ ॥ सार्थ केलें प्रिय प्रभासा ! पुण्यमय निज नांव तें ॥ वाटतें प्रेमें जपावें मन परी हें लाजतें ॥ ५ ॥**

**प्रभा०**— वाः किती गोड काव्य हें ! जिव्हाळ्याचे उद्गार म्हणजे असे असतात !

**मीना०**— स्वतःचं स्वतःला सर्वच गोड वाटतं !—आग बाई ! आई इकडेच आली ! झटकन वेषांतर करावं ! ( चंद्रभागाबाई प्रवेश करते; दोघे लाजतात. )

**चंद्रभागा**— जांवईबुवा ! नको कांहीं मला इतकं लाजायला ! ही वधूपरीक्षा मोठी गमतीचीच झाली म्हणायची ! आहे ना बायको पसंत ? ( मीनाक्षी पळून जाते. ) आज संध्याकाळीं सीमांतपूजन रीतीप्रमाणं होई-लच; पण सध्यां तुम्ही विवाहित आणि अविवाहित या दोन स्थितींच्या सीमेवर उभे आहांत; तर आतांच पेलाभर केशरी, गरम दूध देऊन तुमचं सीमांतपूजन करतें, चला ! चला, लाजूं नका ! मीनाक्षी !—अरे कुठं, पळाली वाटतं ही ! हं, खालीं गेली वाटतं ! चला हं जांवईबुवा ! तुम्हीं आलांत त्याच वेळीं मी तुम्हाला ओळखलं आहे !—चला हं !

**प्रभा०**—( स्व. ) एकंदरींत या बायका चतुर खऱ्या. धाडस करून मी यांची गंमत करायला गेलों, तों यांनींच माझं नाटक केलं ! ( जातात. )

## प्रवेश २ रा.



[ **स्थळः**—रा. सा. बद्रीकेदारांचा दिवाणखाना; **पात्रेंः**—बद्रीकेदार पत्रें वाचीत प्रवेश करतात. ]

**रावसाहेब**०—हें कुणाचं पत्र? अश्वत्थराव पिंपळपाने? काय म्हणतात? 'पत्नी आजारी असल्यामुळें कार्याला येणें होत नाहीं.' बरं हे कोण? बिडेशराव यंकनमड्डी? काय म्हणतात हे? 'आपण कोंकणस्थाशीं संबंध जोडल्यामुळें मी आपला निषेध करतों!' केलास तर केलास लेका! कोण तुला विचारतो? हे कोण? मोक्षगुंडम् पिल्ले? अः हेही येत नाहींत! हें कोण? आमचे जांवईबुवा वैजनाथराव शृंगेरी? ( वाचून ) अहो राणीसरकार! अहो राणीसरकार! आलांत का इकडे? ( मणिकर्णिका प्र. क. ) जांवईबुवा गेले होते ना उत्तरहिंदुस्थानांतली स्थळं पाहायला? हे पाहा, त्यांचं पत्र आलं आहे बनारसहून!

**मणिकर्णिका**—येताहेत ना पण ते लग्नाला?

**राव**०—पत्रच वाचून दाखवितों म्हणजे झालं! 'श्री वनशंकरी प्रसन्न' मुक्काम मणिकर्णिकाघाट...

**मणि**०—जळ्ळं तें! माझं नांव घेणं झालं कीं!

**राव**०—हो, तुमचं नांव मणिकर्णिका नाहीं का? पण मी घेतलेलं नांव तुमचं नव्हे; काशींतल्या घाटाचं आहे! तो घाट निराळा, आपला घाट निराळा! असो; 'मी रविवार ता० १० ला, सकाळीं १० वाजतां गौरीहरास सहकुटुंब दाखल होत आहे.' इ. इ.

**मणि**०—आगबाई! मग वेळ झालीच जांवईबुवा येण्याची! अगदीं केळवणांपासून हजर झाले, हें छान झालं!

**राव**०—जा आधीं. चुलीवर चहाचं अधण ठेवा आणि हें पाहा, मुलीवरून आणि जांवयांवरून गांवंढळाप्रमाणं भात न् भाकरी ओवाळून टाकं नका बरं का? पावबिस्कीटं ओवाळून टाका हटले पामरची! जा अधीं आत्तां येतील. युरोपियन सिस्टीम बेकू! ( ती जाते; तोंच वैजनाथ व कात्यायनी प्र. क. ) या जांवईबुवा! तुमच्या पत्राप्रमाणं वाटच पाहात

आहोंत आम्ही ! ( तो व कात्यायनी नमस्कार करूं लागतात. ) छे छे ! वैजनाथराव ! युरोपियन सिस्टीम हवी. असं महादेवापुढील नंदीप्रमाणं वाकून वंदन करणं, म्हणजे निवळ गांवंढळपणा आहे ! तीच युरोपियन सिस्टीम पहा ! किती रुबाब आणि किती ऐट ! बरं तुमचा प्रवास सुखकर झाला ना ?

**वैजनाथ**–हौदू. बहले न्यट्टगे आइतु ! उत्तरहिंदुस्थान दोळगिन स्थळ-गळुबहळे रम्य उंटु !

**राव०**–छे छे ! वैजनाथराव, मराठींतून बोला ! आपली मायभाषा कानडी आपल्याला येते आहेच; पण तिची बहीण मराठी तीही आपल्याला आली पाहिजे ! म्हणून मी घरीं सर्वांना मराठीचा आग्रह करतों. हिंदु-स्थानांतल्या प्रमुख प्रमुख भाषा तरी आपल्याला अवश्य बोलतां आल्या पाहिजेत ! मराठीचं प्रॅक्टिस झाल्यानंतर मी हिंदीचाही सराव करणार आहे. अहो राणीसरकार ! जांवईबुवा आले आहेत म्हटलं. ( मणिक-र्णिका प्र. क. )

**मणिकर्णिका**–होय का ? अग बाई ! मग पत्राप्रमाणं आले म्हणायचे ( ओवाळते ).

**राव०**–काय कात्यायनी, आमची ओळख नाहींना विसरलीस ?

**कात्यायनी**–इश्श जळ्ळं ! हें काय हो आप्पा ? सासरीं गेलं म्हणून काय माहेरची ओळख कधीं तरी विसरेल का ? तुमचं एक म्हणजे कांहीं तरीच असतं !

**राव०**–आमच्या कात्यायनीचं वय म्हणजे उड्या मारण्याचं. पण पाहा, आत्तांच किती हिच्या अंगांत पोक्तपणा शिरला आहे तो ! हीच युरोपियन गर्ल असती, तर हिनं ' पप्पा पप्पा ' म्हणून माझ्या गळ्याला मिठी मारली असती. पण शुद्ध इंडियन्‌ना ही ! आमच्या यांच्या आग्रहाला बळी पडलों आणि हिचं लवकर लग्न केल. बायकांचा आदर राखणं ही तरी युरोपियन सिस्टीमच आहे. बरं आहे. चला वर दिवाण-खान्यांत. जोतिबा, अरे जोतिबा ताकपिठे ! ( तो प्र. क. ) शुद्ध इंडियन गद्धा लेकाचा ! झाडणी घेऊन कशाला आलास ? आम्हाला झाडून काय

केराच्या टिनपॉटमध्यें टाकणार आहेस कीं काय ? दिवाणखान्यांत बैठक घातलीस का ?

**जोतिबा**–आत्तां तर झाडतूया न्हवं का ?

**राव०**–मग टू चेअर्स इकडे घेऊन ये.

**जोति०**–व्हय आनतों. ( स्व. ) काय बगा ही विंग्रेजी ! टू छेर म्हनं टू छेर ! थूः तुझ्यावर ! [ जातो. ]

**मणि०**–चल कात्यायनी आंत चहा ठेवला आहे.

**कात्या०**–चल बाई. या दांडग्या प्रवासानं मलाही कससंच होतं आहे जळ्ळं ! चहाचे दोन घोट घेतल्यावांचून चैन पडणार नाहीं. (जातात; जोतिबा खुर्च्या वगैरे आणून ठेवतो व वैजनाथाचे कपडे व सामान आंत नेऊन ठेवतो.)

**वैज०**–प्रभासराव कुठं गेले आहेत ? दिसत नाहींत.

**राव०**–तो नवरीला केलेले दागिने आणि शालू घेऊन कुठं आपल्या मित्राला दाखवायला गेला आहे. येईल इतक्यांत.

**वैज०**–पण मी आपल्याला असं विचारतों;–रागावूं नका–प्रयागपंत महांकाळ हे कोंकणस्थ. त्यांच्या मुलीशीं आपण कसा काय विवाह ठरविलांत ? हें आपल्या रुढीला विरुद्ध नाहीं का होत ?

**राव०**–पहिली गोष्ट अशी कीं, प्रयागपंत आपल्या मुलीला आमच्या घरीं द्यायला तयार झाले...

**वैज०**–न द्यायला काय झालं ? आम्ही देशस्थ म्हणजे केव्हांही त्यांच्या; पेक्षां उच्च; इनामं उत्पन्नं आमच्यामधें; खानदानीचे आम्ही; आमच्यामधें शिरायला ते पाहातात, तें योग्यच आहे ! शिवाय मुलगा डेक्कनचा पदवीधर; इस्टेट लाखो रुपयांची; आपण सरकारचे रावसाहेब; असलं स्थळ कोण हातचं सोडील ? घबाडच लागलं गुलामाला !

**राव०**–हें पाहा, वैजनाथराव, युरोपियन सिस्टीम हवी. त्यांच्यांत आहेत का भेदभाव ? आणि आमच्यांतच ‘ तूं कनिष्ठ, मी श्रेष्ठ ’ म्हणण्यांत काय अर्थ आहे ? शिवाय अशा विवाहानं सहज पोटजातींत एकीकरण होतं; आणि हें धर्माविरुद्धही नाहीं ! ( कात्यायनी फराळाचें ठेवून जाते ).

आम्हींच पाय मागं घेतला, तर ही सुधारणा तरी कधीं व्हायची ? बरं, त्यांची मुलगी मी केली; माझी मुलगी नाहींना त्यांच्याकडे दिली ? वरपक्ष माझा आहे. यालाच म्हणतात युरोपियन कावा !

**वैज०**—मुलीचं नांव काय ? मीनाक्षी नाहीं का ? ती चांगली सुशिक्षित आहे का ? नाहीं तर एखादी गांवढळ...

**राव०**—वाः जांवईबुवा ! मग तुम्ही लग्नपत्रिका नीट वाचली नाहीं वाटतं ? ( खिशांतून काढून ) हें पाहा, ' सौ. कां. मीनाक्षी जी. ए. ' अहो, ही आण्णासाहेब कर्व्यांच्या युनिव्हर्सिटीची पदवी आहे. पाहा पुनः जी. ए. म्हणजे गृहीतागमा !

**वैज०**—दोघांनीं एकमेकांना पसंत केलं आहे का ? नाहींतर लग्न होईपर्यंत दोघंही गप्प बसतील आणि अंतःपट दूर होतांच एकमेकांवर गुरगुरूं लागतील !

**राव०**—त्याची नको काळजी. आतांपर्यंत सभासम्मेलनांतून पुष्कळ वेळा त्यांची गांठभेट झाली आहे. शिवाय एकमेकांनीं एकमेकांचे फोटो पसंत केले आहेत. आतां युरोपियन सिस्टीमप्रमाणं एकमेकांचा स्नेह जमून लग्न झालं असतं, तर बरं झालं असतं. तरी पण कांहीं बिघडत नाहीं त्यांत. आमच्या प्रभासनं तर आपल्या भावी वधूवर कांहीं कवितासुद्धां केल्या आहेत म्हणे ! मीनाक्षीनंही लग्नाला आनंदानं रुकार दिला आहे, असं प्रयागपंत महांकाळ खात्रीपूर्वक सांगत होते.

**वैज०**—तरी पण हा देशस्थ–कोकणस्थ विवाह–जाऊंद्या–आतां त्याचं काय ? ठरूनसुद्धां गेलं ! ( जोतिबा प्र. क. )

**जोतिबा**—पार सारा दिवानखाना साप करून बैठक घालूनश्यान टाकली. आतां चला दिवानखान्यांत बसायला !

**राव०**—होय का ? चला तर, वर दिवाणखान्यांतच बोलत बसूं ! ( जा. )

**वैज०**—(स्व.) हा देशस्थकोंकणस्थांचा विवाह कसा होतो, तें मला पाहायचंच आहे ! ई अधर्म्य कार्यद विध्वंस माडि, ई कोंकण्यागे तिरगि मानिगे कळशिदनें, नानु खरे कर्नाटकीयु ! (जातो.)

**जोति०**—ये चोर दिवानखान्यांत ठेवूं या. यो पावबिस्कूट तोंडांत टाकूं या ! यो टेंबल माजगरांत फेकूं या ! ( सर्व घेऊन जातो. )

## प्रवेश ३ रा.

—०००—

[ स्थळ—रावसाहेबांचें घर; पात्रें:—स्वगत विचार करीत प्रभास प्र. क. ]

**प्रभास०**—( स्व. ) प्रत्यक्ष परमेश्वरही काळाच्या घणांनीं तिळतिळ भंगत असेल, पण रूढीवर काळाचीही मात्रा चालत नाहीं! परमेश्वरी इच्छेला तुडवून, वेदशास्त्रांना बुडवून आणि दीनदुबळ्यांना रडवून शिरजोर झालेली निर्दय रूढी सर्वांहून वरचढ झाली आहे खरी! सोळा संस्कारांपैकीं एक लग्नविधिच घेतला, तर शास्त्रांनां हतप्रभ करून या बयेनं आपल्याकडे पूर्ण एकतंत्री सत्ता घेतल्यासारखी दिसते. ( कात्यायनी येते. ) का ताईसाहेब, झाली का अक्षत? आमचं लग्न आणि आम्ही म्हणे देवाला सुद्धां आमंत्रण द्यायचं नाहीं!

**कात्या०**—दादा, काय रे केलंस हें?

**प्रभा०**—काय झालं ताई?

**कात्या०**—कोंकणस्थाची मुलगी काय म्हणून रे पत्करलीस?

**प्रभा०**—मग काय बिघडलं काय? कोंकणस्थ म्हणजे ब्राह्मण नव्हेत का?

**कात्या०**—ब्राह्मण खरे, पण आमच्यापेक्षां कमी नव्हेत का? त्यांची म्हणे उत्पत्ति चितेपासून झाली आहे. म्हणून त्यांना चित्पावन म्हणतात!

**प्रभा०**—मग चितेपासून कुणाची उत्पत्ति नाहीं? मेल्यावांचून कोण जन्माला आला आहे? जगांत मरणाच्या रडारडीवरच जन्माचा हास्यविनोद जन्माला येतो!

**कात्या०**—इश्शं! जळ्ळं, तुझं कांहीं तरीच असतं!

**प्रभा०**—शिवाय असं पाहा, हें लग्न करून मी असल्या दंतकथा निर्माण करणाऱ्याचे दांत चांगलेच घशांत घालणार आहे. चित्तपावन याचा अर्थ अंतःकरणानं पवित्र असा कां करूं नये?

**कात्या०**—ते जर इतके पवित्र आहेत तर जगद्गुरूंच्या गादीवर कां रे बसत नाहींत? तिथं मात्र देशस्थच कां रे हवा लागतो?

**प्रभा०**—हें पाहा, ताई, तूं फार खोलांत शिरूं लागलीस! आतांपर्यंत त्या गादीवर कोकणस्थ बसला नसेल, तर तो जुन्या रुढीच्या दासांनीं बस-

विला नसेल. आमच्या हातांत सत्ता येईल, तर आम्ही नवमतवादी तरुण त्यांना अवश्य बसवूं. आम्हांला तंटे वाढवायचे नाहींत. निदान पोटजातींत तरी एकीकरण करायचं आहे!

**कात्या०**—तर मग तूं त्या पोरीशीं लग्न लावणार म्हणायचं?

**प्रभा०**— कात्यायनी, ती सामान्य पोर नाहीं बरं! तीन्ही त्रिकाळ तिच्या पायाचं तीर्थ घ्यावं, अशी ती साक्षात देवी गंगा आहे!

**कात्या०**— देवी गंगा नवऱ्याच्या डोक्यावर चढून शिरजोर झाली, तशीच ही तुझी गोठलेली, कोंकणी गोरी गंगा तुझ्या डोक्यावर चढून तुला भारी झाली नाहीं, म्हणजे मिळविली!—

[पद ३ रें **चालः**- याचना जपुनिच० **तालः**- त्रिताल.]

**यातना क्षणिं क्षणिं अंगना॥ नमवुनि मना खचित दे तुजसि॥धृ०॥**
**जेवि नार कुटिला चपला॥ रडवुनि घना छळी मानी त्या ना॥१॥**

**प्रभा०**—खोंचदार बोलणीं बायकांनींच बोलावींत! (पाहून) ते पहा तुमचे पतिराज इकडेच येताहेत. तुम्हा दोघांना मोकळेपणानं बोलतां यावं म्हणून आम्ही आपली रजा घेतों, ताईसाहेब! (जातो; वैजनाथ प्र. क.)

**वैज०**—काय म्हणत होते आपले दादासाहेब!

**कात्या०**—त्या गोऱ्यागोमट्या, कोंकण्या, छानछबेलीनं दादावर चांगलीच मोहिनी घातल्यासारखी दिसती आहे! दादाच्या मनांत ती पुरी भरली आहे!

**वैज०**- अंः दोन दिवसांचे ढंग आहेत हे. माझा तरी पक्का निश्चय झाला आहे. कांहींतरी भांडण उपस्थित करून हें लग्न मोडायचंच!

**कात्या०**-- नका, असं कांहीं करूं नका जळ्ळं! पदरीं पडलं न् पवित्र झालं. आप्पांच्या, आईच्या न् नवऱ्या मुलाच्या मनांत आहे, तर आपणच कशाला हें पाप जोडावं मेलं!

**वैज०**—पाप कसलं? रक्त निर्भेळ राखलं, म्हणून उलट पुण्यच लागेल! प्रभासांचं प्रेम हें तूं खरं मानूं नकोस. आपल्या हयग्रीव चिप्पळकुट्टींची मुलगी तंगव्वा यांच्या दृष्टीला तरी पडूं दे, यांनीं तिच्यावरून 'जान कुर्बान'

नाहीं केली, तर नांवचा वैजनाथ शृंगेरीच नव्हे मी! तीच मी यांना ठरविली आहे!

**कात्या०**—अगाई इश्य जळ्ळी! ती कसली काळी...

**वैज०**—काळी असली, तरी नाक डोळे कसे ठसठशीत आहेत. शिवाय सोन्यामोत्यांचे दागिने तर काळ्या माणसाच्या अंगावर चांगले उठून दिसतात. अगदीं अंधळ्यानं अमावास्येच्या अंधारांतसुद्धां अचूक मोजून घ्यावेत!

**कात्या०**—ती कोळशाची खाण तर माझी भावजय कधींच होतां कामा नये. असला मेला अंधार एकदा वंशांत शिरला कीं, सात सात पिढ्या बाहेर जात नाहीं!

**वैज०**—असलं सुवर्णवर्णाचं केतकीपान सर्वांच्याच कुठं नशीबीं असतं?—

[ **पद ४ थें; चालः**—कान्हा निंदनही० **तालः**—धुमाळी. ]

**॥ येशी भूमिवरी सुरललना ॥ भुलुनियां प्रेमसुधापाना ॥ ध्रु० ॥**
**दिसति लोचना, किती अंगना ॥ परि अशी मनोरमता ना ॥ १ ॥**

( पाहून ) अरे आप्पा इकडेच आले. चल आपण दुसरीकडे बोलत बसूं! ( जातात; दुसऱ्या बाजूनें रावसाहेब प्र. क. )

**रावसाहेब**—अरे ताकपिठ्या! ए ताकपिठ्या! पाहुणेमंडळी आत्तां येतील सीमांतपूजनाला. सारी बैठक घातलीस का? ( जोतिबा प्र. क. ) काय रे तयारी केलीस का?

**जोति०**—ही न्हवं का तयारी! ह्यो सोपा, सोप्यावर जाजम, जाजमावर गालीचा, गालीच्यावर ल्वाड, हें हकडं तबाक, त्ये तकडं अत्तार गुलाब! ( वाजंत्री वाजतात. )

**राव०**—अरे वाजायला लागलं. पाहुणे आलेच वाटतं. जा, माझा रुमालन् उपरणं घेऊन ये आणि सर्वांना तयार रहायला!—सांग!—

**जोति०**—आनतों-आनतों! ( स्व. ) लगीनघाईच करत्यात जशी! ( जातो व कपडे आणून देतो; कपडे चढवितात, तोंच विरूपाक्षभट हंपी, वैजनाथ, मणिकर्णिका, कात्यायनी आणि पाहुणे मंडळी प्र. क. )

**कात्या०**—आई, सर्व बायकांना तांदुळ दिलेसना? काय ग बाई त्यांच्याकडची बायका मंडळी? भिकारडीन् जंगली! पैसा खर्च करतांना प्राण

जातो जसा! इश्श! जळळं! त्यांची न् आमची अक्षत एकत्र काढली, ती निराळी काढायला पाहिजे होती. कसली ती अक्षत! मोत्यांच्या ओंजळींत कवड्यांची भेसळ! ( वाजत पाहुणे मंडळी प्र. क. दोन्ही पक्षाकडील बायका एकमेकींना अक्षता मारतात. )

**राव**०—या सर्व पाहुणे मंडळी! बरीं तुमचं सुस्वागत असो! कुडरी!

**प्रयाग**०—सुस्वागत करायला आम्ही परके का आहोंत? आमच्याच घरीं आलों आहोंत आम्ही! ( रामेश्वरभट पुळे व विरूपाक्षभट नारळ देऊन एकमेकांना भेटतात; त्याचप्रमाणें व्याही विहीणी भेटतात व आपआपल्या जागीं बसतात. )

**राव**०—रामेश्वरभटजी, हे आमचे उपाध्याय विरुपाक्षभट हंपी बरं का. मोठा विद्वान् ब्राह्मण. लग्नाकरितां मुद्दाम आले आहेत गलगलीहून! आणि, गुरुजी, हे रामेश्वरभटजी पुळे, प्रयागपंतांचे उपाध्ये!—पंत, ही बायकामंडळी आल्याबरोबर अक्षतांची मारामारी करतात, हें काय प्रकरण आहे?

**प्रया**०—वास्तविक असं आहे, वरपक्ष सीमेवर आला म्हणजे वधूपक्षानं त्यांच्यावर पुष्पांजलि उधळून त्यांचं स्वागत करायचं पण तें एकीकडं राहून त्याला मारामारीचं हें स्वरूप आलं!

**वैज**०—( हळूच ) 'स्वरूप आलं! आलं कीं, लिंबू!

**प्रया**०—हे कोण आपले जामात वाटतं! मोठे चुणचुणीत न् हुषार दिसतात! माथंही तरतरीत दिसतं!—बरं रामेश्वरभटजी, करतांना श्रीमंतपूजनाला आरंभ?

**राव**०—ही श्रीमंतपूजनाची काय भानगड आहे?

**प्रया**०—वास्तविक सीमांतपूजन; पण त्याचें झालें श्रीमंतपूजन! तेंही खरंच आहे. एरव्ही जांवई अठरा विश्वे दरिद्री असला, तरी निदान लग्नाच्या वेळीं उसन्या श्रीमंतीनं कां होईना, पण कुबेराचा बाप बनतो!

**वैज**०—तुमच्या भिकारड्या कोंकणांत उसनी श्रीमंती आणत असतील! आमचे प्रभासराव कांहीं तिकडल्यासारखे दरिद्री नाहींत समजलांत! दारीं मोटारी पाहरा करताहेत?

**महाबळेश्वर**०—यांच्या घराजवळ मोटारस्टँड आहे वाटतें!—मग कां आमच्या मेहुण्यांनीं आपल्या जांवयावर टीका केली वाटतें? अकलेचें

खोबरें खवट झालें असल्यास शहाणपणाच्या उन्हांत तापवावें! आपलें बोलायचें म्हणजे काय? उचलली जीभ लावली आढ्याला!

**प्रया०**—राहूंद्या मामा!—हे मुलीचे मामा बरं का!——महाबळेश्वरपंत पर्वते!—मामा, राहूंद्या!—एकानं झक मारली म्हणून आपणही मारण्यांत काय अर्थ आहे?

**राव०**—ताकापिळ्या, प्रभासाला कपडे घालून ये म्हणावं. खरोखर युरोपियन सिस्टीम भाळ छलू! असले प्रकार बिलकूल नाहींत त्यांच्यामधें!

**प्रया०**—त्यांचें राज्य आहे, म्हणून त्यांच्या सिस्टीमला दर आला आहे! पण वास्तविक आम्ही आमच्या आर्य संस्कृतीबद्दलच आदर राखला पाहिजे. अशी संस्कृति जगांत मिळणार नाहीं. ( प्रभास येतो. ) काय! आले जांवईबुवा? रामेश्वरभटजी, करायचा आतां आरंभ. ( रामेश्वरभटजी आरंभ करतात; संकल्पाच्या वेळीं 'माघे मासे' म्हणतात, तोंच—)

**वैज०**—अहो रामेश्वरभटजी, थांबा! तुम्ही संकल्पांत 'माघे मासे' कसं म्हणतां? आमचा तर फाल्गुन चालला आहे!

**महा०**—खरोखरच फाल्गुन चालला आहे! तुमच्या गांवठीपंचांगाप्रमाणें फाल्गुन चालला असेल; पण आमच्या पंचांगाप्रमाणें माघच चालला आहे ना! रामेश्वरभटजी, म्हणा 'माघे मासे!'

**रामे०**—माघे मासे...

**वैज०**—नाहीं, फाल्गुने मासे!—आमचं पंचांग गांवठी काय? आमचं गांवठी, तर तुमचं रानटी! माघे ब्याडा! माघे ब्याडा!—फाल्गुने...

**रामे०**—फाल्गुने मासे......

**महा०**—शुद्ध पंचागाप्रमाणें आमचा माघ आहे! भटजी, म्हणा 'माघे मासे!'

**रामे०**— माघे मासे...

**वैज०**— तुमचं पंचांग शुद्ध कसलं? तुमचं पंचांग बेशुद्ध आहे? सुम्म फाल्गून म्हणा! सुम्म फाल्गून म्हणा?

**महा०**— आमचं टिळक पंचांग आहे? भटजी, म्हणा 'माघे मासे'!

**राव०**— हा, मी रावसाहेब आहे! त्यांचं नांव या मंगलकार्यांत उच्चाराल तर खबरदार! मी कोण आहे हें लक्ष्यांत घ्या!

**महा०**-- मी पक्का रत्नांगिऱ्या आहें! मधल्या आळीचा मला अभिमान नाहीं कीं, काय? कुणाच्या बापाची भीति आहे त्यांचें नांव घ्यायला ?

**वैज०**-- कुणाच्या घरांत आहांत याची याद आहे का? रावसाहेब बद्री-केदार धनुष्कोटींचा हा बंगला आहे म्हटलं!

**महा०**—मग काय हाकलून द्याल कीं काय मला?

**वैज०**-- त्यांचं नांव तरी घ्या पुन्हा, आणि मग नोडरी काय मजा होतो तो

**महा०**-- प्रयागपंत ! असा माझा अपमान करण्याकरितां मला रत्नांगिरींतून इकडे बोलाविलेंत! इथें अशी उलटीसुलटी करायची होती, तर तिथें रत्नागिरीला काय हजाम नव्हते कीं, काय? हा चाललों रत्नागिरीला! तुमचें लग्न गेलें भुसनळ्याबरोबर आकाशांत उडत! (जाऊं लागतो; त्यास प्रयागपंत बसवितात.)

**प्रया०**-- हें पाहा, मामा असं काय करतां? क्षुल्लक बाबतींत काय म्हणून वाद करायचा? तें सर्वच राहूं द्या. पंचांग जुनें आणि नवें असें म्हणा म्हणजे झालें!

**महा०**--पण महिना कोणता उच्चारायचा? माघ कीं, फाल्गून?

**राव०**—अहो तुमचा माघ राहूं द्या, तुमचा फाल्गूनही राहूं द्या; युरोपियन सिस्टीम बहोत अच्छी! तुम्ही आपलं 'फेब्रुवारी' मासे म्हणा कसं!--हें पाहा, आमच्याकडचे गुरुजी 'फाल्गुने' म्हणतील; तुमच्याकडचे 'माघे' म्हणतील; आटपला वाद!—हं भटजीमहाराज! नडिली! (संकल्प सुरू होतो; प्रयागपंत व चंद्रभागाबाई प्रभासाचे पाय धुतात; पायावर रेघा काढतात; गंधफुलें वाहातात; मुंडवळ्या बांधतात; इकडे महाबळेश्वरमामा तबक्कांत शिवाजी छापाच्या पुतळ्या घालून पुढें ठेवितात.)

**राव०**--मामा, हें काय? या शिवाजी छापाच्या पुतळ्या कसल्या माझ्यापुढं ठेवल्यात ?

**महा०**--हा हुंडा. पंचेचाळीस तोळे सोनें आहे, अस्सल बावनकशी, स्वदेशी, कोलारच्या खाणींतलें!

**वैज०**—यादींत हुंडा नाहीं! हुंडा घ्यायला आमचे रावसाहेब काय कोंकणचे भिकारी आहेत? उचला आधीं हें सोनं!

**राव०** -मी युरोपियन सिस्टिमचा चाहता आहे! हुंडा घेणं माझ्या ब्रीदाविरुद्ध आहे! मामा! न्या परत हुंडा! माझा मुलगा कांहीं मी विकायला काढला नाहीं!

**प्रया०**--रावसाहेबांची इच्छा नसेल तर......

**महा०**--इच्छा नसेल तर काय? इतकी मगरुरी काय कामाची? समोर आलेली लक्ष्मी कशी लाथाडतात आणि आमचा अपमान कसा करतात तो पाहातों! हा हुंडा यांनीं घेतलाच पाहिजे!

**वैज०**--लग्न रद्द झालं तरी हरकत नाहीं; पण आम्ही हुंड्याला नाहीं हात लावणार!

**प्रया०**--रावसाहेब, असं करा, 'हुंडा' म्हणून घेऊं नका; 'वरदक्षिणा' म्हणून घ्या! धर्मशास्त्रानं तसा दोष नाहीं. आत्तां घ्या, नंतर वाटेल तर कुणाला तरी बक्षीस देऊन टाका! पण आमचा अपमान करूं नका!

**राव०**--जोतिबा ताकपिठे! उचल हें तबक आणि जा घरीं घेऊन! बघतोस काय, मनीबॅग उघडल्यासारखं 'आ' वासून? तुला बक्षीस दिलं आहे हें भंगार! लेकर होग मनिगे!

**जोति०**--काय? इक्तं सोनं मला बक्षीस? ( घेऊन ) भलं होऊं द्या, तुमचं सर्वांचं लई भलं होऊं द्या! ( उड्या मारीत जातो. )

**महा०**--आमच्या पाठीमागें बक्षीस दिलें असतं, तर बिघडलें असतें कां? पण हें कर्नाटकी खंवचटच!

**चंद्रभागा०**--पण इकडं जांवयांची पूजा अर्धीच राहिली. इकडं यायचं ना पूजा करायला? आहेर करायचा आहे!

**प्रया०**--हो, आलोंच ना! ( आहेर करण्यास जातात. )

**कात्या०**--अहो आप्पा! हा पाहिलांत का कसला आहेर आणला आहे जळ्ळा तो दादाला देण्याकरितां!

**मणि०**--माझा प्रभास म्हणजे काय अन्नवस्त्राविणें उघड्यावर पडलेला बेवारशी पोरटा आहे कीं, काय? आहेराला कशाला ही असलीं गोणपाटं आणलीं? या गांवांतलीं सारीं जरीकाठी रुमाल उपरण्यांचीं दुकानं हाळ पडलीं वाटतं?

राव०--काय? माझ्या पोराला देण्याकरितां ही पांढऱ्या पायाची अवदसा माझ्या घरांत प्रयागपंतांनीं आणली? मोरासारखा सुंदर दिसणारा माझा मुलगा तुम्ही चुनेगची बगळा बनविणार? उचला आधीं या अपशकुनी घड्या! इच्या पायांत--सारी घडी विसकटेल माझी!

महा०--आम्ही हेच कपडे वापरतों आणि हेच जांवईबुवांना देणार!

राव०--तुम्ही लंगोट्या लावून अर्धनग्न फकीर व्हा! मी माझ्या मुलाला हे दळभद्री चाळे करूं देणार नाहीं! ताकपिठ्या! दे फेकून आधीं ती अस्पृश्य अवदशा माझ्या घरांतून! तुम्ही वाटेल तर आहेर करूं नका; पण असल्या आहेराला मी शिवणारही नाहीं!

प्रया०-मी कांहीं जरीचे रुमाल आणि उपरणीं देणार नाहीं! आहेराबद्दल मी आपलें कोलारच्या खाणींतलें सोनेंच देतों चार तोळे!

राव०--मी तें म्हैसुरी सोनं आतां पुन्हां घेणार नाहीं! अकरा सालच्या पुढचे रुपये पाहिजेत मला! मी रावसाहेब आहे!

चंद्र०--मोठ्या मंडळींनीं असं भांडल्यावर लहानांनीं काय बरं करायचं? रुपये मागताहेत, रुपये देऊन टाकावेत आहेराचे?

प्रया०--बरें तर. मामा, शंभर रुपये देऊन टाका!—रावसाहेब, मी तुम्हाला विचारतों--रागावूं नका--तुम्ही ज्या आपल्या लग्नपत्रिका काढल्या आहेत, त्यांत 'प्रयागपंत महांकाळ यांची कन्या सौ. कां. मीनाक्षी नेमस्त केली, असं कां आणि कुणाला विचारून छापलीत? माझी पोर नेमस्त नाहीं; चांगली जहाल आहे समजलांत? नुकतंच सहज माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें!

कात्या०- अगाई जळ्ळी! जहाल का आहे? मग नकोग बाई आमच्या घरामधें! आमचा दादा नेमस्त आणि ती जहाल, जुळायचं कसं?

महा०--जुळायचें कसें? पांसरी अडीसरी मिरच्या रोज खायला घालत चला तुमच्या दादाला, म्हणजे होईल तो जहाल!

वैज०--नाहीं, तुमच्याच भाचीला भेंड्याची भाजी आणि दूधभात घालीत चला म्हणजे होईल ती नेमस्त!

**मणि०**--असल्या भयंकर स्वभावाची मुलगी असेल, तर नकोग बाई ती! आमच्या प्रभासाच्या अंगाचे वाभाडेच काढील! जिवंत आग जवळ ठेवून कधीं कुणाला शांति मिळाली आहे का!

**वैज०**--असली जहाल वधू अजूनही रहित करतां येईल! रावसाहेब! नीट विचार करा. वधू नेमस्त नाहीं, जहाल आहे!

**चद्रं०**--आतां नका काढूं भलत्या सलत्या शंका. मी सर्वांचे पाय धरतें. सर्वांच्या पुढं पदर पसरतें. मुलगी जहाल नाहीं कांहीं नाहीं. मनानं फुला-प्रमाणं मृदु आहे. मुलीला पत्करा आणि आम्हांला धन्य करा! (प्रयाग-पंतास) आपण तरी असा पोरकटपणा काय बरं करायचा?

**प्रयाग०**--नाहीं नाहीं, मला याबद्दल कांहीं भांडायचं नाहीं. सहज प्रश्न उपस्थित केला झालं!

**कात्या०**--रस्त्यांत फार्स नको, म्हणून बोललें नाहीं आम्हीं. अक्षतीला जातांना यांनीं ग्यासच्या दिव्याबद्दल मशाली आणल्या होत्या, हें लक्ष्यांत असेलच, आप्पा, तुमच्या? चांगल्याच अकलेच्या मशाली पाजळल्या पाहु-ण्यांनीं! मेल्यांची भेसलोटचीही तयारी दिसत नाहीं!

**महा०**--जी आमच्यांत चाल नाहीं, तें आम्ही कांहीं करणार नाहीं! आज भेसलूट मागतां, उद्यां भोमकीरतां हट्ट धराल! यादीप्रमाणें चला. यादींत आहे तुमचें-- भेसलूट कीं, भुस्कूट तें!-- चंद्राक्का! हा विहीणींना द्यायचा तोबरा!

**कात्या**--जळ्ळं मेलं लग्न! विहीणींना तोबरा द्यायला काय त्या घोड्या आहेत?

**वैज०**--काय? माझी बायको घोडी? सासूबाई! ही छोटी घोडी आणि आपण मोठी घोडी! रावसाहेब! घाला तोंडांत लगाम आणि बांधा पाय-बंद!

**मणि०**--कशाला मेलं हें घर पाहिलं? पावलापावलाला अपमान होत आहे? पण लक्ष देणं होतं का इकडे!

**महा०**--तोबरा देण्याची पद्धत आहे, म्हणून पुढें ठेवला? माझ्याकडे काय चूक आहे?

**राव०**--याकीरतांच युरोपियन सिस्टीम हवी! आतां कोणी रागावूं नका. बरं, किती उरला आहे आतां हा सभारंभ!

**महा०**--कांहीं नाहीं. पानसुपारी आणि भिक्षुकांना दक्षिणा दिली कीं, झालें. करवलीचे पाय नंतर धुवायचे असतात वाटतें!

**प्रभा०**--(स्व.) नवरदेव नांवाचा कोणी प्राणी लग्नांत असतो, हें भांडणाच्या भरांत या व्याहीविहीणींच्या लक्षांत आहे कीं, नाहीं कोण जाणे! (अत्तरगुलाब, दक्षिणा देऊं लागतात; वाजंत्रीं वाजत असतां पडदा पडतो.)

---

# अंक २ रा.



## प्रवेश १ ला



[स्थळः--रावसाहेबांचा दिवाणखाना; पात्रेंः- प्रभास व कात्यायनी.]

**प्रभा०**--ताई, हा तरी रुखवताचा सभारंभ शांत चित्तानं उरकून घ्याल का? का इथंही व्याहीविहीणींची लढाई व्हायची आहे?

**कात्या०**--भांडणाची हौस कां रे आहे कुणाला, दादा? तीं कोकणीं कुरापत काढतात म्हणून तर आम्हांला तोंडाला तोंड द्यावं लागतं! तो सारभात भुरकणारा महाबळेश्वर कसं सटासटा बोलतो, बघितलंस ना?

**प्रभा०**--आणि आपले पतिराज काय कमी करतात?

**कात्या०**--हं हं, आत्तांपास्नं बायकोचा कैवार घेऊन आमच्यांना नांवं ठेवायला लागलास वाटतं? बरोबरच आहे तुझं. बोलणारच तूं त्यांच्या बाजूनं!

**प्रभा०**--तसं नव्हे ताई...

**कात्या०**--तर कसं हो दादासाहेब?

**प्रभा०**--हें पहा, मंगलकार्यांतल्या या तुमच्या असल्या चाळ्यानं हांसं कुणाचं होतं?

**कात्या०**--हो, आमचं हांसं होतं; मग काय तुझं म्हणणं? हांसतील त्यांचे दांत दिसतील! दिसलेले दांत पाडायला आमचे आप्पा मस्त खंबीर आहेत!

यांत तुला कांहीं बोलायचं कारण नाहीं नी तुला कळतही नाहीं! आम्ही 'व्याहीविहीणी' आहोंत आणि आमचा मानपान आहे; पाहून घेतों काय तें तें बघ वाजायला लागलं, रुखवत आलं वाटतं? तूं मुकाट्यानं माडीवर जाऊन बैस जा कसा. ये म्हटलं तर यावं, जा म्हटलं तर जावं!

**प्रभा०**–(स्व.) आम्हा सुशिक्षितांत जर एवढो पानपत गाजते आहे; तर अडाण्यांच्या लग्नांत भारतीयुद्धच होत असेल! कलहप्रिय व्याहीविहिणींनो! कोपरांपासून नमस्कार तुम्हांला! (जातो.)

**कात्या०**–आई, अग आई! (मणिकर्णिका प्र. क.) वाजायला लागलं, रुखवत आलं वाटतं?

**मणिकर्णिका०**–त्यांचं कसलं भिकारड्यांचं रुखवत? अधिक महिन्याचं वाण दिल्यासारखं कांहींतरी वाळंळ सुळंळ, गोडधोड आणतील झालं! आपली बैठकीची तयारी आहेच! (वाजत गाजत विहिणी येतात; ताटें वगैरे मांडून फराळाची तयारी करतात.)

**चंद्र०**–कात्यायनी ताई, जांवईबुवांना बोलवतां ना?

**कात्या०**–हो, तुमचा हा सुग्रास भीमपाक, नळपाक येतो केव्हां आणि आपण एकदां गिळतों केव्हां, या आशेनं आमचा दादा अगदीं तुमच्या रुखवताची वाटच पहात बसला आहे! (जाते व प्रभासाला आणून बसविते.)

**चंद्र०**–झालं वाढून. बसायला कांहीं हरकत नाहीं. (आपोशनी घालूं लागते.)

**कात्या०**–बायकोच्या धांदलींत नी सासूबाईच्या थाटांत दादाला आतां कशाला आमची आठवण होते आहे! आई! चल आंत. खुश्शाल दादा एकटाच फराळावर ताव मारीत बसू दे! (ती व मणिकर्णिका जातात.)

**चंद्र०**–(स्व.) अगोबाई! करवलीला फराळाला बसायला सांगायला विसरलें! करतां काय? हातापायां पडून आणलं पाहिजे तिला! देवा! आणखी काय वाटेल ती शिक्षा कर, पण पुन्हां मुलीची आई मात्र करूं नकोस! (जाते.)

**प्रभा०**–(स्व.) लढाईचे पवित्रे झाले वाटतं सुरू! (तिघी येतात.)

**चंद्र०**–हें पहा, हें आमचं पहिलं वहिलं कार्य; कांहीं चुकलं, तर आपण थोरपणानं सावरून घेतलं पाहिजे! बसा हं कात्यायनीताई! ( फराळाला बसणार इतक्यांत कात्यायनी ताडकन उठते. )

**कात्या०**–दादा! खबरदार तोंडांत घास घालशील तर! आई! कसलं ग हें भिकार रुखवत? सारे जिन्नस जळ्ळे गुळाचेच केले आहेत! साखरेची चिमटही कशांत नाहीं! हे कसे ग खायचे?

**मणि०**–रांडेच्यांना साखरेला दळिद्र आलं होतं, तर आमच्याकडे भीक मागायला कां आले नाहींत? दिली असतीं पोतीं दोन पोतीं पाठवून! साखरेचा गडगंज डोंगरच्या डोंगर कोठींत पडला आहे!

**चंद्र०**–आम्ही गरीब आहोंत. गूळ हा खाण्याचाच पदार्थ आहे ना? गरीबाची जी कांहीं मीठभाकरी असेल, ती गोडपणानं मान्य करून घ्या!

**मणि०**–मग तुम्ही साखरेचे पदार्थ नाहींना आणीत?

**चंद्र०**–साखरेचं नांव काढलं कीं आमच्या घरीं सारं घर डोक्यावर घेणं होतं!

**कात्या०**–मग तुमच्या घरीं वाटलं, तर भिकार गूळ खात चला! इथं आणलांत तर हीं अशीं ताटं आम्ही फेकून देऊं ( फेकतात. ) चल रे दादा! काय इथं बसलास निलाजऱ्यासारखा? कधीं पाहिले होतेस कीं, नाहीं करंज्या लाडू? ( उठविते. )

**प्रभा०**–( जातांना स्व. ) हें महायुद्ध एवढ्यावरच विझलं, तर बरं आहे; नाहीं तर आपण मीनाक्षीची शेवटची भेट घेऊन या गांवाला शेवटचा रामराम ठोकणार! वीट आला मला या परिस्थितीचा!

**कात्या०**–घुटमळतोस का? चल चालता हो माडीवर! ( त्याला आंत ढकलते, तोंच रावसाहेब व वैजनाथ प्र. क. )

**रावसाहेब**–रुखवत आटोपलं कीं, नाहीं?

**कात्या०**–आग लागली त्या रुखवताला! सारे पदार्थ गुळाचेच केले आहेत! कसं खायचं जळ्ळं!

**राव०**–काय? माझ्या एकुलत्या एक पोराच्या रुखवताला गुळाचे पदार्थ! हे प्रयागपंत महांकाळ मला कोण समजतात?

**वैज०**–तुम्हाला पुण्याहवाचनाचा गणपति समजतात! ( प्रयागपंत व महाबळेश्वर प्र. क. )

**प्रया०**–( चंद्रभागाबाईस ) काय अजुनी रुखवत आटोपलें कीं, नाहीं?

**राव०**–काय हो प्रयागपंत! सारे पदार्थ गुळाचे काय म्हणून केलेत?

**प्रया०**–मग बिघडलें काय? साखर ही दुसऱ्याच्या घरची–मॉरिशस्ची; आणि गूळ तर आमच्या खास मळ्याचा! पहा तरी कसा मिष्टास आहे तो!

**वैज०**—तुमच्या मळ्यांतला असला म्हणून काय झाला? म्हणून आमच्या प्रभासरावांना गुळाचे खडे चारणार कीं, काय तुम्ही? म्हणजे काय ते इझीट आहेत?

**महा०**—पूर्वी साखर होती कधीं? गुळावरच आम्ही सारे बसत उठत होतों!

**वैज०**–तुम्ही गुळावर बसा उठा, नाहीं तर त्यांत पडून उंदराप्रमाणं मरा! पण आमच्या घरांत काय म्हणून गूळ? आज 'आमच्या मळ्यांतला' म्हणून गूळ जांवयाच्या पानांत वाढलांत; उद्यां 'आमच्या मळ्यांतली' म्हणून तंबाकू आणि हत्ती–अल्ला अल्ला–कापूस वाढाल!

**चंद्र०**–त्यांची इच्छा आहे तर साखरेचे पदार्थ करावेत!

**प्रया०**—ती पांढरी अवदसा घरांत तरी येऊं दे, तिच्यासह सर्वांचेच पाय मोडून टाकीन! आमच्या मळ्यांत साखर झाल्याशिवाय आणि मी ती करतांना प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय तिचे पांढरे पाय मी घराला लावूं देणार नाहीं!

**राव०**—युरोपियन लोक गूळ वापरीत नाहींत! युरोपियन सिस्टीम होना!

**कात्या०**—आणि बाहेर वाजंत्रीं कसलीं आणलीं आहेत, ती पाहिलींत का, आप्पा? बँडचं नांवच नाहीं! ताशा, चौघडा, कुंभाराचं करंढोल न् महाराचीं हलगीं असलीं गांवठी वाद्यं आणलीं आहेत! असल्या वाद्यांच्या गजरांत नवरामुलगा निघाला, तर सारं गांव फिदीफिदी हांसेल! बँडशिवाय आम्ही मुळींच बाहेर पडणार नाहीं!

**वैज०**—आतां त्या वाद्यांत गोंधळीपिचाऱ्यांची एक संबळ आणि तुणतुणं मात्र राहिलं आहे! तेवढं आणा म्हणजे जांवयाला दारोदार भीक मागत फिरायला बरं पडेल!

**महा०**—आम्ही बँड मुळींच आणणार नाहीं!

**मणि०**—नाहीं आणणार तर नवरा मुलगा मंडपांत मुळींच येणार नाहीं! आणि यांनीं जांवयाला नेण्याकरितां काय वाहन आणलं आहे तें बघा! मोटार तर नाहींच, पण व्हिक्टोरिया, टांगा, घोडाही नाहीं! तर दोन बैलांचा छकडा आहे! आणि त्यावर शोभा यावी म्हणून ऊंस उभे करून आंब्याचे डाहाळे बांधले आहेत! हें काय लग्न आहे कीं, आमची थट्टा चालविली आहे!

**महा०**—बैलाची गाडी आणली म्हणून बिघडलें कुठें?

**चंद्र०**—महाबळेश्वर! असा शब्दाला शब्द वाढवूं लागलास, तर मुहूर्त कसा साधायचा?

**महा०**—थांब गे आक्का, तुला कांहीं कळत नाहीं!—प्रयागपंतांच्या मळ्यांतले खास बैल आहेत त्यांचे आणि उत्तम गाद्या घालून गाडी शृंगारली आहे! पौराणिक काळीं अशी चाल होती!

**वैज०**—पौराणिक काळीं वर वधूला पळवून नेत असे; म्हणून आतां तसं केलं तर शोभेल का? रावसाहेब, तरी बरं, यांनीं बैलगाडीच आणली; माकणीचा रेडा नाहीं आणला; नाहीं तर प्रभासराव छान यमराजासारखे शोभले असते! एका हातांत फास आणि एका हातांत गदा दिली म्हणजे झालं!

**राव०**—काय हो महांकाळ, माझ्या पोराला नेण्याकरितां बैलगाडी आणलीत? जांवयाची मिरवणूक म्हणजे काय श्रावण महिन्यांतल्या शंभुमहादेवाची जत्रा समजलांत वाटतं? हा मी माझा अपमान समजतों! याबद्दल मी अब्रूनुकसानीची तुमच्यावर केस करीन!

**महा०**—खुश्शाल करा! कोर्टें भांडायला हा रत्नागिऱ्या मागें पाय घेणार नाहीं! हायकोर्टेंच काय, पण प्रीव्हीकौन्सिलही खिळखिळें करण्याची धमक याच्यामधें आहे, समजलांत? आफूस पायरीचें दोन वर्षांचें उत्पन्न नाहीं झालें समजेन!

**प्रया०**—खुश्शाल करा! मी मुलींच कोर्टाची पायरी चढणार नाहीं!

**कात्या०**—मोटार राहिली, पण यांनीं पालखी तरी आणायची होती! ती तरी आपली होती ना?

**महा०**—पालखी ठेवली आहे आमच्या बापांनीं!...

**चंद्र०**—महाबळेश्वर! अरे, हें तूं काय बोलतो आहेस?

**महा०**—मग भितों कीं, काय? पुन्हां म्हणतों, पालखी ठेवली आहे बापकाकांनीं! पालखींत बसायला लढाई गाजवावी लागते! नुसतं ' यम् फयस ' केलं, म्हणजे पालखी मिळत नाहीं! संस्थानिकांनीं आपले सोन्यासारखे शेकडों पुरुष लढाईत बळी दिले, म्हणून त्यांना चौघडापालखी मिळाली! आमची काय योग्यता आहे पालखींत बसण्याची? आम्हांला छकडाच छान!

**चंद्र०**—महाबळेश्वर! मी तुझ्या पाया पडतें, पण तूं आणि आगींत इंधन टाकूं नकोस बाबा! किती झालं तरी आमचा मुलीचा पक्ष! अरे, नवऱ्याकडची मंडळी कमी जास्त बोलायचीच, पण तें मनावर घेऊन कसं चालेल? लग्नांतले चार दिवस संपले कीं, यांतलं कांहीं राहात नाहीं समजलास? या वेळीं मूग गिळून स्वस्थ बसल्याशिवाय आम्हांला गत्यंतर नाहीं!

**महा०**—आम्ही मूगही गिळणार नाहीं आणि भुइमूगही गिळणार नाहीं!

**चंद्र०**—(प्रयागपंतास) आपल्या सारख्यांनीं असं भांडत तंडत बसल्यावर जगांत हांसं कुणाचं होईल बरं? ज्यांचं लग्न, तीं नवराबायको एकमेकांवर खूप आहेत आणि आम्ही, ' व्याहीविहीणींनीं ' विनाकारण तंटा करण्यांत काय फायदा?

**महा०**—आक्का आम्ही पड म्हणजे घ्यायची किती? त्याला कांहीं मर्यादा आहे कीं नाहीं? हा कानडीआप्पा आमची एकही गोष्ट चालूं देत नाहीं!

**वैज०**—येनो सूळीमगन, भाळ माताडती?

**महा०**—हां, शिवी दिलीस तर खबरदार! मला कानडी येत नसलें तरी कानडी शिव्या मात्र मी पाठ करून ठेवल्या आहेत, समजलास? हा प्रसंग येणार हें मला माहीतच! कसा झालें तरी मी दूरदर्शी रत्नागिऱ्या आहे!

तरी माझी बायको आली नाहीं; ती आली असती तर तिनें साऱ्या मांडवाला आगच लावून दिली असती !

**राव०**—पाप्याचीं पितरं दिसणारीं हीं कोंकणीं हाडं इतकीं चिकट आणि हट्टी—असतील अशी माझी कल्पना नव्हती !

**वैज०**—म्हणूनच मी म्हणत होतों; हें देशस्थ कोंकणस्थाचं लग्न नको म्हणून या कोंकण्या भातबोकण्यांशीं आमचं कधींच जमायचं नाहीं !

**महा०**—कायरे तुकडमोड्या कर्नाटक्या ! भात म्हणजे काय सामान्य समजलास ? कोणते धान्य महाग आहे रे जोंधळा कीं, तांदूळ ? धर्मशास्त्रांत कोणतें मान्य आहे रे ? होमाला भात लागतो कीं, भाकरीचे तुकडे ? महागाईचा भात खाणाऱ्या आम्हांला 'भातबोकण्या' म्हणतोस ? मी कोंकण्या तर तूं देशावारी करणारा देश्या !

**राव०**—या डोंगरांतल्या माकडांना भाकरीपोळीची काय गोडी माहीत असणार ? यांनीं भाताचे पिंडच गपागप गिळावेत !

**प्रया०**—आम्ही डोंगरांतील माकडें तर तुम्ही मैदानावरचीं खोकडें ! यन् माडती कान झाडती करणाऱ्या या दंडकारण्यांतल्या, रानवट रुंडूगुंडूना कोंकणांतल्या सौंदर्याची काय कल्पना येणार ?

**राव०**—भाजक्या जमीनींत होरपळणाऱ्या आणि मिठांत लोळणाऱ्या या गेंगण्यांना—तोंड बंद ठेवून नाकानं त्वंपुरा करणाऱ्या या नागसापांना देशावर येऊं दिलं, हीच आमची चूक झाली !

**महा०**—प्रयागपंत, उडदाला तेल लावल्याप्रमाणें दिसणाऱ्या या रोगणी शनैश्वरांना कशाला दिलीत आपली मुलगी ? देशस्थ तेवढे सारे अवसेचे अंधार !

**कात्या०**—आणि कोंकणस्थ तेवढे पांढरे झुरळ ! आमचे 'हे' काळे असले, तरी शाळिग्रामाची कांति तकतकते आहे तोंडावर ! आणि तुमचीं तोंडं म्हणजे पांढरीं फटफटीत पडलेलीं ! तुमचे गोऱ्यांचे पाय आमच्या देशाला लागले नी आमची पोळी तुमच्या पानांत गेली !

**मणि०**—आमचे जांवईबुवा तसे थोडेसे सांवळे असले म्हणून काय झालं ? पण आमचे 'हे' आणि तुमचा जांवई तरी नाहींना काळा ? श्रीकृष्ण

नव्हते का सावळे? तोंड काळं असलं, तरी मन गोरं असावं; नाहीं तर तुमचं तोंड बघावं तर गोरं पान आणि अंतःकरणांत काळकूट विषाचं ठाण!

**वैज०**—हे कोंके चिकटांतले चिकट असतात! एक पैशाकरितां मरतील, पण जगण्याकरितां मात्र एक पैसा खर्च करणार नाहींत!

**महा०**—आणि हे देशे घरच्या इस्टेटीची उधळपट्टी करतां करतां शेवटीं यांच्या हातांत भीक मागयाला परटंही रहात नाहीं!

**वैज०**—यांचे डोळे पिंगळ्यासारखे असतात

**महा०**—आणि यांचे कावळ्यासारखे दिसतात! हे देशे आपल्या सख्ख्या बहीणीच्या मुलीशीं लग्न करतात! काय हा अधर्म!

**वैज०**—पौराणिक काळीं ही पद्धत होती. पुराणकाळचे लोक महामूर्ख होते वाटतं? नारळाची शेंडी राखली—नारळाचे न्हावी तुम्ही—नारळाची शेंडी राखली म्हणजे डोक्यांत कांहीं अक्कल येत नाहीं!

**महा०**--हा बद्रिकेदार पहिल्या प्रतीचा मवाळ...

**वैज०**--आमचे रावसाहेब मवाळ असले, तरी पूर्ण चंद्राप्रमाणं शीतळ आणि सुंदर आहेत समजलास! तुझ्या या महांकाळासारखे आगजाळे जहाल नाहींत! यांच्या धगीनं घरसुद्धां एखाद्या वेळीं पेटायचं!

**राव०**--या गुलामांना राजकारण म्हणजे काय माहीत असेल तर शपथ!

**प्रया०**--हां, रावसाहेब! तोंड संभाळून बोला! इतिहासाचा हा धडधडीत खून करीत आहांत!--छत्रपति शिवाजी महाराजकी जय!--छत्रपतींना मदत करणारे मावळे कोंकणचेच होते!

**राव०**—पण त्यांचे राजे देशस्थ होते! राम खंबीर असला म्हणजे त्याला मदत करायला वाटेल तितकीं माकडं मिळतात!

**प्रया०**—छत्रपति देशस्थ नव्हते; ते चितोडच्या राजघराण्यांतले रजपूत होते!

**राव०**--कोंकण्यांनीं राज्य घालविलं मात्र!

**प्रया०**--जसें मिळविलें तसें घालविलें! तुम्ही मिळविलें नाहींत न् घालविलेंही नाहींत!

**राव०**--असल्या वितंडवाद्याची मुलगी मला मुळींच कर्तव्य नाहीं! माझ्या कार्ट्याला फासावर चढवीन, पण तुझ्या पोरीचे फास नाहीं त्याच्या गळ्यांत अडकविणार! हीच माझी प्रतिज्ञा!

**वैज०**--जय कर्नाटक! भाळ छल् गोष्ट झाली!

**प्रया०**--माझीही हीच प्रतिज्ञा: माझ्या पोरीला विहिरींत ढकलीन पण तुमच्या घरांत देणार नाहीं!

**कात्या०**--आई! वाईट वाटूं देऊं नकोस. हा मुहूर्त वाया गेला तरी दादाचं लगीन झाल्याशिवाय कांहीं रहात नाहीं!

**मणि०**--माझ्याही मनाला या विजोड लग्नाबद्दल रुखरुख लागून राहिली होती! अगाई झालं हें बरं झालं!

**चंद्र०**--सर्वांनीं प्रतिज्ञा केल्या, पण वधूवरांकडे कुणीच लक्ष्य दिलं नाहीं! आई! जोगेश्वरी! माते! आतां या सर्वांना तूंच मार्ग दाखीव ग बाई! ( मूर्च्छित पडते. )

**महा०**--प्रयागपंत! आक्काला मूर्च्छा आली वाटतें?

**राव०**--( स्व. ) ही एक ब्यादच झाली म्हणायची! सावध झाली म्हणजे मिळविली! ताकपिठ्या! जा जा लवकर त्या जोसेफ डॉक्टरांना बोलावून आण!

**प्रया०**--माझ्या बायकोच्या अंगाला जोसेफ डॉक्टराचा हात लागला, तर तो तिथल्या तिथें कलम करीन! महाबळेश्वर, जा त्या तिरुपति शास्त्र्यांना --त्यांना नको--ते देशस्थ आहेत--त्या परशुरामशास्त्री वैद्यांना घेऊन या! ते घाऱ्या डोळ्याचे अस्सल कोंकणस्थ आहेत! ( तो जातो. )

**राव०**--जा, वैद्य आणा नाहींतर ब्रह्म आणा! आतां आम्हांला पंचाईत करण्याचं कांहींच कारण नाहीं! ( वाजंत्री वगैरे मंडळीसह महाबळेश्वर प्र. क. )

**महा०**--हे शिंचे वाजंत्री न् गडी लग्न मोडलें म्हणून बोंबस्या मारताहेत! आणि पैशाकरितां धरणें धरून बसले आहेत!--जातां कीं नाहीं आपल्या घरांस? लग्नाच्या यादींत ज्याचा खर्च त्यानें करायचा असें लिहिलें आहे! मग आम्ही काय म्हणून तुम्हांला पैसे द्यायचे? ज्याचा खर्च त्यानें करायचा! तुमचा खर्च तुम्ही करा! जा!

**वैज०**--देशस्थकी जय !

**महा०**---कोंकणस्थकी जयजय ! ! ( पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा.



[ **स्थळः**--मीनाक्षीची खोली; **पात्रेंः**--मीनाक्षी विचार करीत प्र. क. ]

**मीनाक्षी**---हृदयस्थ गौरीहरा ! तुला शतशः प्रणाम असोत ! अहाहा ! किती भाग्यवती मी ? आपल्या मुकुटांत कोहिनूर लकाकला याबद्दल एकाद्या सम्राज्ञीला, आपल्या भालीं पूर्णचंद्र चमकला याबद्दल पूर्णिमेला किंवा आपल्या मस्तकावर अंशुमाली झळकला याबद्दल पूर्व सुंदरीला जितका आनंद झाला नसेल, तितका आनंद आज मला होत आहे ! हें आनंदमय प्रतिभाशाली काव्य त्या विधात्यानं सहजसमाधींत, अंतरंग प्रफुल्लित असतांना, हातांत शांतिब्रह्माचं कलम घेऊन माझ्या भालपत्रावर अमृतानंच लिहिलं असलं पाहिजे ! देवदैत्यांनीं मंथन करून समुद्रांत परस्वाधीन आणि परिमित असं अमृत निर्माण केलं; पण माझ्या प्राणेश्वरानं माझ्या हृदयांत प्रेमामृताचा अखंड सागरच उचंबळविला ! आधींच एकमेकांत प्रेमानं गुंफलेल्या हृदयावर वाद्यांच्या गाजावाजांत जनतेचा शिक्कामोर्तब होणार म्हणायचा ! हृदया ! असं उतावीळ होऊं नकोस ! थांब, तो मंगल मुहूर्त जवळच आला आहे ! ( प्रभास प्र. करतो; त्यास उघड ) अगबाई ! हें काय ? आपल्याला बोलवायला तर सारी मंडळी गेली आहेत आणि इथं आपण एकटे कसे ?

**प्रभा०**--एकटा कुठं आहे ? बरोबर हृदयाचा धरणीकंप आहे ?- सुखाचा प्रलयकाल आहे !

**मीना०**--इश्श ? अशा मंगल वेळीं भलतंच अशुभ बोलूं नये ! (हांसत) असं वरचेवर गुप्तपणें भेटायला काय यायचं तें ! इतकं वायकोचं वेड चांगलं नव्हे !---

[पद ५वें; चाल- रसीले नइन; ताल- धुमाळी.]

**न हांसे काय परिहासें, जगीं जनता, पाहा नाथा अशा या दिनभर वधु-ध्यासें? ॥ धृ० ॥ युवति-निकटिं का चंद्र वसे ॥ सतत; म्हणुनि त्या प्रेम नसे? ॥ भेटे कसा उपेस पुसा ॥ कांत रवि प्रभातिं; हा न्याय ध्यानीं ॥ धरुनि बना खासे ॥ १ ॥**

**प्रभा०**-हृदयाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्यावर, मनाक्षी वेड लागल्याशिवाय कसं राहील? वेड्याच्या डोक्यांत कणभर तरी मेंदु शिल्लक असतो; पण तेवढाही मेंदु—मेंदूच काय, पण मीही या गलिच्छ जगांतून या वेळीं पूर्णपणें नाहींसा झालों आहें! मीनाक्षी! तुझ्यासमोर वावरणारा तुझा प्रभास वैर, कलह, दुष्ट भावना, गर्व आणि मत्सर या पांच राक्षसांनीं केव्हांच स्मशनांत पोचविला असून तुझ्या डोळ्यांना भासमान होणारा हा तो नसून त्याचा आत्मा तडफडत तरळतो आहे!

**मीना०**- नका हो जिवाच्या राजा, नका असं बोलूं! ब्रह्मांडाची राखरांगोळी झाली, तरी बेगुमान असणारं स्त्रीहृदय या कल्पनेच्या नुसत्या झुळकेनंच चक्काचूर होऊन जातं! प्रसंगीं कठोर होऊन जगांतील भयंकर संकटांना फुलं बनविणारं हृदय या कल्पनेच्या एका लहरीनंही वितळून जातं! सांगा, नाथ, हे विषारी बोल कां निघाले मुखांतून?

**प्रभा०**- मीनाक्षी! मी तुझा निरोप मागण्याकरितां आलों आहें!

**मीना०**- काय? माझा निरोप?

**प्रभा०**- होय, निरोप! शेवटचा निरोप! उभयतांच्या आईबापांनीं मारल्यामुळं बनलेलं हें प्रभासाचं पिशाच, तुझ्या मुखचंद्राच्या कक्षेच्या बाहेर दुःख, निराशा आणि तळमळ यांच्या भेसूर अमावास्येंत, अखंड तडफडत पडण्याकरितां आतां रवाना होणार!

**मीनाः**- सांगा, हृदयनाथ, सांगा! काय झालं तुम्हाला? कां तुम्ही असं बोलतां? ( जवळ जाऊन स्पर्श करते. )

**प्रभा०**-मीनाक्षी! बाजूला हो! मला स्पर्श करूं नकोस. तूं आतां माझी राहिली नाहींस. मी तुला स्पर्श करीन, तर परस्त्रीच्या अंगावर हात टाकल्याचं पाप माझ्या हातून घडेल!

मीना०—हृदय जोडणं परमेश्वराच्या हातांत असतं; शरीराचा वियोग करणं त्याच्या हातांत असलं, तरी हृदय तोडणं त्याच्याही हातांत नसतं! जगांत आतां असा कोण समर्थ आहे कीं, तो मला आपल्यावांचून दुसऱ्याशीं विवाहबद्ध करील?

प्रभा०—पण आपल्या दोघांच्या जन्मदात्या ईश्वरांनीं भांडण करून आपलं लग्न रद्द ठरविलं! कार्याकरितां जमविलेल्या साहित्यानं ते आतां आमची क्रिया करणार!

मीना०--काय आपल्या घरीं भांडणतंटा होऊन लग्न रहित झालं?

प्रभा०--होय, ही गोष्ट जगांत जर परमेश्वर असेल, तर त्याच्या इतकीच सत्य आहे!

मीना०--एवढ्या समंजस माणसांनीं असा अविचार केला?

प्रभा- ०वास्तविक प्रेमानं अभिन्न असलेल्या दांपत्यावर, आपल्या आशीर्वादाच्या चार अक्षता उधळण्याशिवाय ज्यांच्याकडे विशेष कामगिरी नाहीं त्या व्याही विहिणींनीं आणि त्यांच्या जमलेल्या अलबत्यागलबत्यांनीं, आपआपसांत ईर्षेला पेटून अशीं वधूवरांचीं हृदयं जाळावींत आणि जगांत जीव जाईतों त्यांना तळमळत ठेवावं, हा अन्याय नव्हे काय?

मीना०--देवाची अर्चा करायला निघालेल्या पुजाऱ्यांनीं देवच उचलून फेंकून दिला म्हणायचा!

प्रभा०--सोमनाथाचा विध्वंस करणाऱ्या या अघोर महम्मुद गझनवींचं तोंडही बघणं नको म्हणून—त्यांतून आकाशांतील चंद्राप्रमाणं तुझा मुखचंद्र आतां नुसता दूरूनच पहावा लागणार, या असह्य हालांतून स्वतःला टाळावं म्हणून—कुठं तरी दूर-- जिथं तुझी आठवणही होणार नाहीं, इतक्या दूर—मी निघालों आहें आणि त्याकरितांच तुझा शेवटचा निरोप घेणार आहें!

मीना०—माझा कसला निरोप घेतां? नाथ, मीच तुमच्याबरोबर येणार!

प्रभा०—छेः हें मुळींच शक्य नाहीं!

मीना०—चंद्र अस्ताला गेला आणि त्याची कांति पृथ्वीवर घुटमळत राहिली, अग्नि विझला आणि त्याची दीप्ति मागं दिसली, राम वनवासी झाला आणि सीता राजवाड्यांत राहिली, असं कधीं झालं आहे का?

प्रभा०—तूं परस्त्री...

मीना०--नका, हीं अक्षरं आपण तरी उच्चारूं नका! ( मिठी मारून ) हृदयराजा! तूंच मला असं दूर लोटल्यावर या त्रिभुवनांत मला पाऊल ठेवण्यापुरता तरी आधार आहे का? तूं माझा नाहींस, तर या जगांत माझं कुणी नाहीं! तूं माझा असशील तर मी भडकलेल्या भडाग्नींतही चंदेरी शांति लुटीन! आणि तूं नसशील, तर नंदनवनांतही हालाहलाच्या तप्त रसांत तडफडत पडेन!

प्रभा०--आपल्या मंगलकार्यांचा आपल्याच मंडळीकडून चाललेला विध्वंस पाहून मला तिटकारा उत्पन्न झाला; वडील मंडळीसंबंधीच्या पूज्य भावनेवर जबरदस्त धक्का बसला आणि वाटलं कीं, कुठं तरी काळं करावं! खोट्या मानापमानाच्या भरीला पडून आपलींच पोरं भक्षण करणाऱ्या या क्रूर श्वापदांपासून चार हात दूर राहण्याकरितां, मीनाक्षी, मी जंगलांतल्या व्याघ्रसिंहांना जानीदोस्त करण्याकरितां निघालों आहें! ते जंगलचे राजे आपल्या कृपाहस्तानं देहाचे तुकडे करतात, पण अंतःकरणाला तरी धक्का लावीत नाहींत; पण हे क्रूर पशु देह शाबूद ठेवून अंतःकरणाच्या मात्र चिंधड्या उडवितात!—

[ पद ६ वें; चालः—मदांधा जना०; तालः—त्रिताल. ]

**॥ नको लोचना, कदा खलकाल अवलोकना; दुष्टा दया ना ॥ धृ०॥ पक्षांधता व्यापितां यांना, करिती पहा ठार निज अर्भकांना॥ या नीतिहीनापरी क्रौर्य ना दानवांना ॥**

मीना०—नका, माझ्या गळ्याची शपथ आहे, वडील मंडळीसंबंधानं असं बोलूं नका! त्यांच्याबद्दल आदर बाळगूं, त्यांना सूर्यनारायणाप्रमाणं लांबूनच नमस्कार करूं आणि त्यांच्या आशीर्वादाची आशा बाळगीत कुठें तरी दूर देशीं जाऊं!

प्रभा०—प्रणयभंगानं छिन्नविच्छिन्न होईन, पण, 'मीनाक्षी परपुरुषा-बरोबर उठून गेली' असा तुझा दुर्लौकिक होऊं देणार नाहीं!

मीना०—अजुनी मी दुसऱ्याची आहे, असंच आपल्याला वाटतं ना?

प्रभा०—तूं माझीच आहेस. मधांतली गोडी, हिऱ्यांतली कांति किंवा शुक्रांतली लकाकी जशी निराळी काढतां येणार नाहीं, तशी माझ्यापासून

तुला किंवा तुझ्यापासून मला निराळा करतां येणार नाहीं! हा हृदयांचा विषय झाला; पण शरीरांनीं मात्र आतां भिन्नभिन्नच राहिलं पाहिजे!

**मीना०**—आपण गेल्यावर एक क्षण तरी मी जगेन असं वाटतं का?

**प्रभा०**—अशा निराशेच्या जीर्णारण्यांत जगून तरी काय करायचं आहे? विषम भावनांनीं कंटकमय झालेल्या जगाला अखेरचा रामराम ठोकून ज्या ठिकाणीं सत्य, प्रेम आणि पूर्णानंद नांदत असेल, अशा हर-मेश्वरी जगांत जाऊं! हें जग सैतानी आहे! प्रवास करतांना आम्हीं निव-डलेली धर्मशाळा, चोर दरवडेखोरांनीं गजबजलेली, पापाचारांनीं लडबडलेली आणि हीन मनोवृत्तींत बुजबुजलेली आहे! या जगाचा मला वीट आला आहे! हें जग परमेश्वरी असतं, तर असले दुष्ट प्रकार डोळ्यांना केव्हांच दिसले नसते!–सोड, मीनाक्षी, मला सोड आतां!

**मीना०**—नका, माझा त्याग करूं नका! ही पायाची मिठी मला अखंड लाभूं द्या! सर्पाच्या विळख्यांतही लक्ष्मीनं नारायणाचे पाय सोडले नाहींत आणि मीच तेवढी......

**प्रभा०**–(उठवून जवळ घेतो.) मीनाक्षी! मला क्षमा कर! मला तुला बरोबर नेतां येत नाहीं! माझी बेअब्रू मी कशीही सहन करीन, पण तुझी बेअब्रू मला मुळींच सहन होणार नाहीं! माझ्याकरितां आपल्या घरादारा-वर लाथ मारलीस, माझ्याकरितां जननिंदा सहन करायला तयार झालीस, माझ्या सुखाला मारून दुःखाला कवटाळलंस, या तुझ्या निष्ठेनं तूं मलाही लाजविलंस! हृहयांत धैर्य नसल्यामुळं मी तुला बरोबर न्यायला भितों आहें, असं समजूं नकोस! माझी खरोखरीच प्रामाणिक समजूत आहे! कदाचित ती चुकीची असेल! तूं माझ्याबरोबर आलीस, तर सारं जग 'तूं उठून गेलीस' असंच म्हणेल!

**मीना०**–( स्व. ) आतां करूं तरी काय! देवा! हा माझा प्राण भरकन उडून गेल्यावर मला पुन्हां दिसेल तरी का? आतां या बुलबुला-करितां कोणता पिंजरा तयार करूं? हां अठवलं! असंच करावं! ( उ. ) हृदयदेवा! आत्तांचा ठरविलेला लग्नाचा मुहूर्त आपण दोघांनीं साधला तर?

**प्रभा०**--म्हणजे?

**मीना०**--व्याहीविहीणी रुसत, फुगत, भांडत बसूद्यात; आपण आपलं शुभमंगल या मुहूर्तावर साजरं केलं तर?

**प्रभा०**--हो, या गोष्टीला माझी पूर्ण तयारी आहे!

**मीना०**--अशानं आपण देशांतराला जाणार नाहीं; मला आपला वियोग होणार नाहीं आणि मी उठून गेलें म्हणून माझा दुर्लौकिकही होणार नाहीं! मुहूर्त साधेल आणि आमच्या एकीनं कदाचित भांडणं मिटतील! वडील मंडळी रागावलीच तर हातापाया पडून त्यांचा राग नाहींसा करूं!

**प्रभा०**--बस्स् असंच करायचं! आपल्या गौरीहरांपासून एक मैलावर बागेंत हिंदमातेचं मंदीर आहे. तें मुद्दाम कार्याकरितांच बांधलं आहे. तिथं सर्व साहित्य सदा सिद्ध असतं! तुला हें सर्व माहीत आहेच. तिथं जाऊं आणि हा शुभमुहूर्त साधूं! (घड्याळ पाहून) अजुनी अवकाश आहे. टांगा करून जाऊं म्हणजे झालं. (पडद्यांत प्रयागपंतः--कार्टीला ठार मारीन पण त्या रावसाहेबाच्या घरीं देणार नाहीं! हरामखोर! मगरूर!)

**मीना०**--अगबाई! रागावलेले आण्णा आले वाटतं! या इकडच्या जिन्याच्या दाराला कडी घालून आपण त्या दारानं पसार होऊं! (कडी घालते.) चलायचं आतां लवकर! आण्णांच्या दृष्टीस पडलों, म्हणजे सर्वच पंचाईत! ( जातात. )

---

## प्रवेश ३ रा.



[ **स्थळः**--गौरीहरांतील एक रस्ता; **पात्रें**:--मणिकर्णिका व जोतिबा प्र. क. ]

**जोतिबा**--ह्यें सारं शिकनं नडतंया! बाईसाहेब शिकनं नडतया! न्हाइ तर परबासरावांची पळून जान्याची काय ताकद व्हती! आमच्या त्या जन्या शेळक्याला आपली बाईल पसंत न्हवती, तर त्याच्या पिच्चाड्या आवळून त्येचं लग्गीन लावलं न्हवं का!

**मणिकर्णिका**--आतां करूं तरी काय आणि रडूं तरी किती? बाळा प्रभासा! कुठं रे गेलास आणि काय धिंडवडे झाले हे? जोतिबा, नाहीं, नाहीं त्या कल्पना डोळयापुढं उभ्या राहातात आणि जिवाचा थरकांप होतो!

**जोति०**--यांच्या संगं जवा ती आवाबी पळालीया, तवा त्या दोघांनीं जिवाचं कांहीं बरं वाईट न्हाई क्येलं ह्ये खास! बसलीं असत्याल कुठं तरी गुलुगुलु गोष्टी बोलत न्हैतर 'फस् फुस यस् फ्यस' करीत!

**मणि०**--नाहीं रे, मी परवां 'अमृतपुलीन' नांवाची कादंबरी वाचली आणि त्यांत बघ दोघा नवराबायकोंनीं नदींत उड्या घेऊन जीव दिला!

**जोति०**--आतां तसं कुटलं व्हायला? मरत्यात म्हनं मरत्यात! त्येंचं त्वांड बगा! त्ये पूर्वींच्या काळीं होऊन ग्येलं. इट्टलाची आन सांगतों, तसं काय न्हाई बगा! हीं दोगं जन कुटं तरी चाभजीं खात बसल्यात होटेलमंदी!

**मणि०**--एकुलता एक मुलगा; साऱ्या गौरीहर गांवांत झाला नाहीं, असा कार्याचा धडाका उडवीन असं ठरविलं होतं......

**जोति०**—मग आतां काय कमी धडाका उडालाया? लगीन मोडल्या-पास्नं गांवांत सारखी धडेबाजीच सुरू झालीया न्हवं का!

**मणि०**—देवा! करायला गेलें काय न् झालं काय!

**जोति०**—तुमचीं डोकशीं फुटलीं न्हैत ह्यें नशीब समजा! परवां त्या आमच्या तिप्याच्या लगनांत इवाई इवाई भांडल अन् त्या भरांत डोकीं फोडून येकमेकांनीं येकमेकांच मुडदं पाडल न्हवं का? हं काय? मग मांडवाच येळू, छताचं मांजरपाट, गुलाल न् इड्याची पानं त्यांच्या शेव-टच्या यातरेला उपयोगी पडलीं! अन् लगनाचा शिदापानी बाराव्याला खलाप झाला!

**मणि०**-जोतिबा, असं भलतंच बोलून माझ्या काळजावर निखारे ठेवूं नकोस या वेळीं!—अगाई! हे आले, पण बरोबर कुणीच नाहीं! (राव-साहेब प्र. क.) नाहींना सापडला कुठं बाळ?

**राव०**-विहीरी, तळी, नदी, नाले सारे शोधले; स्टेशनवर माणूस जाऊन आला; हॉटेलं--खाणावळी धुंडल्या; बागा--धर्मशाळा पालथ्या घातल्या; सारं गौरीहर शहर तपासलं; पण बाळाचा कुठंच पत्ता नाहीं! (कात्यायनी व वैजनाथ प्र. क.) जांवईबुवा! बाळाचा कांहीं पत्ता लागला का?

**कात्या०**-नाहीं, आम्हांला दादा कुठंच दिसला नाहीं!

**मणि०**—प्रयागपंत महांकाळांचा श्राप तरी आम्हांला बाधला नसेल? माझा मुलगा सांपडला तर त्यांच्याच मुलीशीं त्याच लगीन लावीन रे देवा!

**वैज०**—भलतंच! इतकी लढाई करून, विजय मिळवून शेवटीं शत्रूला शरण जायचं कीं, काय?

**कात्या०**-- कसले शत्रू न् कसले मित्र? दादा सांपडला तर सारेच मित्र आहेत; नाहीं तर सारे शत्रूच बरं! दादानं मनाला लावून घेऊन कांहीं भलतंसलतं केलं नसलं म्हणजे मिळविली! ( महाबळेश्वर प्र. क. )

**महाबळेश्वर**— ( स्व. ) तरी मी म्हणत होतों पोरींना शिकवूं नका म्हणून! पण या आमच्या प्रयागपंतांची अक्कल गेली मसणांत आणि आपल्या पोरीला ताडभर वाढवून माडभर बुकें शिकविलींन् यानें! आतां पोर कुठें उठून गेली ती कशी शोधायची? डोंबल!

**मणि०**— महाबळेश्वरपंत! सांपडली काहो तुमची भाची?

**महा०**-- भाची पडली वैलांत न् तुम्ही गेला चुलींत!

**वैज०**-- हां, संभाळून माताड! नाहींतर नहरलाच पाठवीन थंड व्हायला!

**महा०**— माकूत्यान् माकत्यान् हा कां येतो माझ्या अंगावर? काय मी याचें घोडें मारलें आहे कीं, आंबा फणस तोडला आहे कीं, कोकमाचें सार प्यालों आहें?—मणिकर्णिकाबाई! तुमचा मुलगा उलथला, तिकडेच आमची भाची निर्दाळली!

**राव०**— मामा, आतां तरी तोंडाला थोडासा पायबंद घाला! सध्यां आपल्यावर कोणता प्रसंग कोसळला आहे, याचा विचार करा!

**जोति०**— ( स्व. ) ह्ये कोंकन्‌चं मीठ देशावरच्या चटनीला काय ऐकत न्हाई! ( प्रयागपंत व चंद्रभागा प्र. क. )

**चंद्रभागा**— महाबळेश्वर, नाहींना सापडली मीनाक्षी? कुठं आहे, माझी बाळी?

**महा०**—तुझी बाळी ठेवली आहे या कनवटीला!

**प्रया०**—आणखी दोन वर्षं लग्न केलं नसतं, म्हणून कुठं बिघडलं असतं? देशस्थकोंकणस्थांचे संबंध जोडले, कुणी नाहीं तें केलं, म्हणून का असं झालं?

**महा०**--मी पहिल्यापासूनच तुम्हाला तसें बजावलें होतें!

**वैज०**--मीही रावसाहेबांना पहिल्यान्दा हेंच सांगितलें होतें!

**चंद्र०**--झालं तें झालं, काय? मणिकर्णिकाबाई, माझी बाळी सापडली, तर तुमच्याच मुलाला देईन बरं!

**महा०**--यांचा कार्टा आमच्या कार्टीच्या पुढें तरी येऊं दे, त्याची शेंडी धरून त्याच्या माडाचें पाणी नाहीं वाजविलें तर नांवाचा रत्नांगिऱ्याच नव्हे मी!

**प्रया०**--मामा, इतकं भीष्मपर्व गाजूनही अजुनी तुमची भांडणाची हौस नाहीं का भागली?

**जोति०**--अवो मामासाब! आमच्या परभासरावांची तुम्ही चेंडकी धराल, पन त्येस्नी ती हाय कुटं? तुमच्या टक्कुरीला मातर मक्याच्या कनसावानी झुबकदार दिसतीया, ती संबाळा बघा! न्हाई तर ती येईल माझ्या हातामंदीं!

**राव०**--चूप! ताकपिट्या! ओव्हर बोलूं नकोस! (स्व.) या सर्वांना लग्न-सभारंभ साजरा करण्याकरितां बोलावलं, तों या लेकांनीं माझा बोजवारा चांगलाच उडविला!

**चंद्र०**--असं रस्त्यांत उभं राहून कसं चालेल? पोरांचा शोध नको का करायला!

**प्रया०**--नव्याण्णव हिश्शानं दोन्ही पोरं एकत्रच असणार! आपण सर्वच मिळून, पूर्वीचं विसरून त्यांचा शोध करूं या!

**वैज०**--(स्व.) हे दोघं व्याहीविहीणी चलबिचल झालेलीं दिसतात! इष्टू खटपटी माडी मूरदिद ई मदवीयू, मत्तु कूडवदो हॅगे?

**कात्या०**--चला, सर्वजण शोध करूं या. रस्त्यांत असे झगडे करण्यापेक्षां दादाच्या शोधांत असलेलं बरं!

**वैज०**--( कात्यायनीस एकीकडे ) येन हिंग्याक माताडती? लग्न जुळेल एखाद्या वेळीं!

**कात्या०**--या वेळीं कांहीं बोलूं नका. आधीं दादा सापडूं दे; मग काय तें ठरवूं जळळं! ( मोठ्यानें ) चला ना सारीं! ( जातात. )

**जोति०**--ह्यें काय लगीन कीं स्वांग! 'इवाईहीनी' वाजंत्रीं वाजवीत गांवभर भटकत्यात अन् न्हवरान्हवरी कुटंतरी गुमानं झटकत्यात! ( जातो. )

## प्रवेश ४ था



[ स्थळः–हिंदमातेचें मंदिर; पात्रेंः–प्रभास व मीनाक्षी बोलत प्र. क. ]

**मीनाक्षी**–या वेळीं जर चार मंडळींच्या साक्षीनं आपलं लग्न झालं नाहीं, तर कदाचित् दोघा घराण्यांत कायमचं वैर पडून मुलींच लग्न न होण्याचा संभव आहे!

**प्रभास०**–हें व्याहीविहीणींचं भांडण लोकांनीं पेटविलेलं आहे; स्वयं-स्फूर्तीचं नव्हे! वास्तविक दोघांचेही वडील भांडखोर वृत्तीचे नाहींत. या वेळीं आपण आपला कार्यभाग साधूं. आम्ही दोघं एक आहोंत असं त्यांना दिसून येतांच ते आपसांत तह केल्यावांचून राहाणार नाहींत!

**मीना०**–त्यांनीं तह नाहीं केला, तर आम्ही दोघं त्यांच्या हातापाया पडून, त्यांची विनवणी करून त्यांचा राग शांत करूं. आण्णांना तरी माझ्याशिवाय कोण आहे?

**प्रभा०**–आणि आप्पांना तरी माझ्याशिवाय कोण आहे? असो. अशा गडबडींतही हा पोषाख मी अंगावर चढवावा, असा तूं हट्ट धरलास तेव्हां तुझ्या तत्वनिष्ठेची तारीफच केली पाहिजे!—

[ पद ७ वें चालः–मधुरानना ताल–त्रिताल. ]

**॥ शिकवावया जगता या, राष्ट्रप्रेम–बल–तेज–वीरता येसि योग्य समया ॥ धृ० ॥ जन धरील भावें व्रताला ॥ भाग्यलाभ तरि मिळे त्याला ॥ त्यजिल निज भया ॥ १ ॥**

पण यावेळीं 'व्याहीविहिणीं'ची काय अवस्था झाली असेल?

**मीना०**—वधूवर फरारी झाल्यामुळं व्याहीविहीणी--करवल्यांची चोंहो-कडे धावपळ सुरू झाली असेल. हें हिंदमातेचं मंदिर जरा लांब असल्या-मुळं आमचा पत्ता त्यांना लवकर लागणं शक्य नाहीं. आई देवीच्या कृपेनं हा शुभ मुहूर्त साधला म्हणजे मिळविली!

**प्रभा०**—एक मुहूर्त चुकला, तर त्याच्यापुढं पाऊण तासानं लागलीच दुसरा मुहूर्त आहे! श्रीशैल्यराव तुळजापुरकर आणि गिरनारपंत गंगोत्री

एक्स्टेन्शनवरील मंडळींना आणि गोकर्णभटजींना बोलवायला गेले आहेत. मंडळी आली कीं, मंगलाष्टकं सुरू झालींच म्हणून समज!

**मीना०**— हिंदमातेच्या मंदिराची कल्पना मोठी सुंदर आहे नाहीं?

**प्रभा०**— हो देशसेवेचे धडे द्यायला अशीं मंदिरं छान उपयोगी पडतात.

**मीना०**—लग्नांतील अग्निनारायणासमोरील व्यावहारिक शपथांत आर्यांनीं, देशसेवेच्याही शपथेचा समावेश करायला पाहिजे होता!

**प्रभा०**—आर्य धर्मसेवा आणि देशसेवा यांत भेद मानीत नसत; किंबहुना देव, धर्म आणि देश यांच्याकडे ते ऐक्याच्या दृष्टीनंच पहात असत. 'नमो मात्रे पृथिव्यै ।' असं यजुर्वेदांत म्हटलं आहे; 'माता भूमिः पुत्रोऽहं पृथिव्याः।' असं अथर्ववेदांत म्हटलं आहे; माता आणि जन्मभूमि यांचं ऐक्य केल्यावर, 'मातृदेवो भव' असं उपनिषदांनीं सांगितलं; देशांतील चातुर्वर्ण्ययुक्त समाज हाच विराटपुरुष; याचंच वर्णन ऋग्वेदांत आहे; अर्थात् 'अर्थे च धर्मे च कामे च' अशी शपथ घेणाऱ्यांना देशसेवेंतून सुटतां येत नाहीं; कारण धर्म म्हणजेच देवसेवा आणि आर्य तर देव आणि देश यांत भेद मानीत नाहींत!

**मीना०**— अहाहा! किती संदर विचार हे! इकडे सर्व कांहीं समजतं आहे, पण...

**प्रभा०**— पण तें सहचारिणीच्या सहवासानं दृढ व्हायचं होतंना! माझं मन म्हणजे सुंदर सिद्धांताच्या ग्रंथाचीं सुटीं पानं. चंचलवृत्तीच्या वाऱ्यानं तीं आतांपर्यंत सैरावैरा उडत होतीं; पण आतां मात्र तुझ्या तेजस्वी सद्गुणांचं त्यावर दडपण बसूं लागल्यामुळं योग्य मर्यादेंत एके जागीं राहतीलसं वाटतं!

**मीना०**— उगीच हा मला मोठेपणा द्यायचा होतोय् गडे! सद्गुणांच्या दृष्टीनं मी इकडच्या पासंगालाही पुरणार नाहीं!

**प्रभा०**— शुद्ध बैलोबा असलेल्या आपल्या पतीला महादेवाचा नंदिकेश्वर बनविण्याची पद्धत अस्सल आर्यस्त्रियांची आहेच!

**मीना०**— असं बोलून लाजवूं नये गडे मला!—या मंगलकार्याचा प्राण इतका सुविद्य आणि आनंदी असतांना त्याला या वडील मंडळींनीं कासावीस करावं, म्हणजे हें आश्चर्यच नव्हे का?

प्रभा०– या ' व्याहीविहीणीं ' ना लग्नमंडप म्हणजे लढाईचं मैदानच वाटत असतं !

मीना०– मग मंगलवाद्यं म्हणजे रणवाद्यंच म्हणायचीं तीं !

प्रभा०– लग्नपत्रिकेवर केशर शिंपडतात, तें मला वाटतं लढाईतल्या भावी अनर्थाचं दुश्चिन्हच–रेडसिग्नल असावा !

मीना०– लग्नांतील याद्या म्हणजे ते युद्धाचे तहनामे ! फरक एवढाच कीं, लढाईतले तहनामे नंतर होतात आणि लग्नांतले प्रथम करतात !

प्रभा०– पंचपक्वान्नांचे हारे, म्हणजे तो लढाईतला दारूगोळा !

मीना०–असंच असावं; नाहींतर एरव्ही मरतुकडे असणारे पाहुणे लग्न मंडपांत येऊन लाडवांवर हात मारतांच लढाईचे दोन हात करण्याइतके बळकट कसे होतात ?

प्रभा०– लग्नांत जमविलेले सारे पाहुणेपै पंक्तिपठाण आनंदमय दिवाळीचा भेसूर शिमगा करण्यांत तरबेज असतात ! या बाबतींत त्यांचा कुणीही हात धरणार नाहीं !

मीना०— वधूवर एकमेकाशीं जन्माचीं बद्ध होत असतांना या मंगलकार्यांत ' व्याहीविहीणीं ' ना आणि पाहुण्यांना अमंगळ भांडण करण्याशिवाय दुसरा कांहींच उद्योग नसतो !

प्रभा०–आणि यांना घरांत खायला अन्न नसलं आणि ऑफिसांत वरिष्ठांच्या पायांचीं फुलं जरी रोज यांच्या डोक्यावर पडत असलीं, तरी लग्नांत मात्र तिळभरही अपमान सोसायला हे तयार नसतात !

मीना०–आपण रुसतात, फुगतात ते फुगतात आणि जांवयालाही रुसवितात !

प्रभा०–दोन घराण्यांत जन्माचा संबंध जोडण्याकरितां या पाहुण्यांना प्रवासखर्च देऊन बोलवितात, पण...

मीना०–पण हे खाल्लयाघरचे वासे मोजणारे पाहुणे दोन्ही घराण्यांचे तुकडे तुकडे करून चांगलीच कसाबगिरी गाजवितात !

प्रभा०-मूळ वधूवरांचे आईबाप सहसा भांडणाला प्रवृत्त होत नाहींत; पण हेच पाहुणे त्यांना ईर्षेला पेटवून या महायुद्धांतले हिंडेनबुर्ग, लुडेनडार्फ जनरल फ्रेंच बनवितात !

**मीना०**—मला वाटतं, जसा संपत्तीचा, अधिकाराचा, शक्तीचा, स्तुतीचा उन्माद असतो, तसाच वरमाईचा, करवलीपणाचा, वरपक्षाचा उन्माद असावा !

**प्रभा०**—असंच असलं पाहिजे. त्याशिवाय एरव्ही मुलीच्या लग्नाच्या वेळीं मऊ असणारा वधूपक्ष मुलाच्या लग्नाच्या वेळीं टणक बनून उड्या कशा मारतो ? आई हिंदमाते ! मंगलकार्याचा बोजवारा उडविणारी ही 'व्याहीविहीणींची मनोवृत्ति ज्या दिवशीं नष्ट होईल, तो सुदिन !

**मीना०**—ज्यांचं लग्न, ज्यांच्याकरितां एवढा खर्च, जे या उत्साहांतले लक्ष्मीनारायण त्या वधूवरांच्या मनस्थितीचा कुणीच विचार करीत नाहीं !—

[ पद ८ वें; रागः—भैरवी ; तालः—केरवा. ]

**॥ परि आतां, प्रिय कांता, सनाथा बने वनिता मार्ग नवा धरिता ॥ ध्रु० ॥ न्याय रुचावा त्या प्रभुदेवा ॥ हेतु मनीं हा कां न वसावा ॥ धीर देत विनता ॥ १ ॥**

**प्रभा०**—त्या बिचाऱ्यांच्या हातापायांत दागिन्यांच्या, मंडोळ्यांच्या आणि लग्नकंकणांच्या बेड्या ठोकून त्यांना पाहुण्यांच्या नजरकैदेंत ठेवलेलं असतं. चार दिवस आलेले हे परके उपरे स्वतः आपण घरचे यजमान होतात आणि अस्सल यजमानांना पाहुणे बनवितात, याप्रमाणं साऱ्या मंगलकार्याचा विध्वंस करून, हे स्वतःच्या आहेरांत कांहीं चुकल्यास लग्नाचं निमंत्रण करणाऱ्याला शिव्यागाळीचा आहेर करून, चार दिवस बडविलेल्या लाड-वांच्या धुंदीत निजधामाला जातात !

**मीना०**—आणि नंतर मग त्यांनीं घातलेला शेणसडा उभय घराण्यांना आणि वधूवरांना निस्तारावा लागतो !

**प्रभा०**—अरे, ही पाहा आलीच मंडळी. आतां आपली बडबड थांबविणं हेंच श्रेयस्कर आहे. ( मंडळी येतात. ) या गिरनारपंत. सर्व मंडळींना आमंत्रण केलंत ? झाली सर्व तयारी ? गोकर्णगुरूजी, नमस्कार !

**गोकर्णभट०**—मी हें लग्न लावतों आहे खरं, पण माझ्यावर कांहीं किटाळ नाहींना यायचं ?

**प्रभा०**—त्याची अगदीं काळजी करूं नका. तुमच्यावर कांहींही किटाळ येणार नाहीं. फक्त तुम्ही मुहूर्त साधून आमच्यावर मंगलाक्षता टाका !

**गोक०**—मग हरकत नाहीं. नाहीं तर म्हटलं, गौरीहरांत तुमचे आईबाप असतांना इथं लग्न कां?—अहो गिरनारपंत गंगोत्री, सर्व तयारी आहे ना?

**गिरना०**—हो मंडळी आली कीं, मंगलाष्टकाला सुरवात करायची. दुसरा मुहूर्त आहेच.

**गोक०**—पण काय हो, मधुपर्क कसा करायचा? त्याला तर वधूचा पिता पाहिजे!

**गिर०**—आधीं मुहूर्त साधून मंगलाक्षता पडल्यावर मधुपर्क केला तर चालेल कीं, नाहीं?

**गोक०**—हो, तसा विकल्प आहे.

**गिर०**—तर मग आधीं मुहूर्तच साधा. तोंपर्यंत यांची मंडळी बहुत करून येतील आणि नाहीं आली तर पुढं कार्यंतं पाहूं म्हणे. मुहूर्ताला अजुनी दहा मिनिटं अवकाश आहे. तोंपर्यंत मी माझं कार्य आटोपतों. सभ्य स्त्रीपुरुषहो! गौरीहर गांवांतील व या उपनगरांतील प्रमुख सद्गृहस्थांनीं फंड वगैरे जमवून, बहुशः अशा तऱ्हेचं कुठंही नसलेलं हें हिंदमातेचं मंदिर बांधल्याला आज उणींपुरीं दोन वर्षं होऊन गेलीं आहेत. उद्देश हाच होता कीं, व्याख्यानं, चर्चा, सभा, लग्नमुंजी, सार्वजनिक उत्साह, वसंतगौर वगैरेला हें स्थान उपयोगी पडावं. आनंदाची गोष्ट कीं, संस्थापकांच्या इच्छेप्रमाणं या स्थानाचा उत्तम प्रकारें उपयोग होत आहे आणि त्याची साक्ष हा आजचाच समारंभ देत आहे. असो. आतां वधूवर हिंदमातेला वंदन करून तिच्या चरणाजवळ श्रीफळ ठेवतील आणि येथील नियमाप्रमाणं प्रतिज्ञा करून तिचा आशीर्वाद घेतील. गोकर्णभटजी, ह्या दोघांच्या हातांत दोन नारळ. ( नारळ देतात. ) प्रभासराव, मीनाक्षीताई, मग ही प्रतिज्ञा उच्चारून पुन्हां वंदन करायचं! ( दोघे नारळ ठेवून नमस्कार करतात. )

**प्रभा०**—आमच्या एकंदर परिस्थितीचा विचार केला, तर आमचा विवाह या हिंदमातेच्या मंदिरांत राष्ट्रीय पद्धतीनं होईल अशी मला कल्पना सुद्धां नव्हती!—परंतु जगांत न होणाऱ्या गोष्टी अकल्पित होत आहेत. त्या पैकींच ही एक गोष्टआहे. या अद्भुत घटनेमुळंच मला स्वतःला अत्यंत आनंद होत आहे. आतां येथील नियमाप्रमाणं प्रतिज्ञा करित आहें. (वाचतो.)

माझ्या सहचारिणीशीं मी गृहस्थाश्रमाचे सर्व धर्म यथाशास्त्र पाळीत असतांना हिंदमातेला विसणार नाहीं. (देवीला व सर्वांना नमस्कार क.)

**मीना०**--हें देवालय बांधण्यांत आमच्या आण्णांनीं म्हणजे प्रयागपंत महांकाळ यांनीं बराच पुढाकार घेतला होता, याबद्दल मला अभिमान वाटत आहे. पण परिस्थिति अशी उत्पन्न झाली कीं, ज्या उद्देशानं हें देवालय बांधलं, त्या उद्देशाप्रमाणं त्यांना स्वतःच्या कन्येचं लग्न मात्र इथं करतां येईना. पण मातेच्या मनांत आम्हांला आपल्या पायाजवळ आणायचं होतं. त्या-माणं गोष्ट घडून आली आणि आमचा आंतर हेतु पूर्ण झाला. आतां मी प्रतिज्ञा वाचतें. (वाचते.) माझ्या पतिदेवाशीं स्त्रीधर्मांचं यथाशास्त्र पालन करीत असतांना मी हिंदमातेला विसरणार नाहीं. (देवीला व मंडळींना नमस्कार करते.)

**गिर०**-सभ्य स्त्रीपुरुषहो, सुमुहूर्ताची वेळ नजिक येऊन ठेपली आहे. आतां या उच्चशिक्षणमंडित, देशभक्त वधूवरांवर मंगलाक्षता टाकून यांना शुभाशीर्वाद द्याल अशी आशा आहे. श्रीशैल्यराव, सर्वांना अक्षता दिल्यात? ठीक आहे. गोकर्णभटजी, झाली वेळ. अंतःपट धरायला हरकत नाहीं.

**गोक०**--ठीक आहे. (अंतःघट धरून मंगलाष्टकें म्हणतात; नंतर एकमेकांच्याकडून एकमेकांच्या गळ्यांत पुष्पहार घालवितात; देवीला नमस्कार करवितात; तोंच रावसाहेब, प्रयागपंत, महाबळेश्वर, वैजनाथ, जोतिबा, मणिकर्णिका, चंद्रभागा व कात्यायनी प्र. क.)

**मणि०**--अगबाई! माझा प्रभास सापडलाग बाई! बाळा, आम्हांला न कळवितां इकडे कसा रे निघून आलास?

**चंद्र०**--आत्तां माझा जीव भांड्यांत पडला! बाळ मीना, तूं डोळ्यांना दिसेपर्यंत हजारो भयंकर देखावे माझ्या डोळ्यापुढं उभे राहिले.

**वैज०**--यांचं इथं कुणी लग्न लावलं? या भटुर्ग्यानं! कोण तुम्ही?

**गिर०**-- मी गिरनारपंत गंगोत्री.

**राव०**--हिंदमातेच्या मंदिरांत माझ्या मुलाचं लग्न? आतां माझ्या रावसाहेबींचं कसं होणार?

**वैज०**--रावसाहेब, पाहिलात तुमच्या मुलाच्या अंगावरचा पोषाख?

**राव०**—पोर सापडलं म्हणून आनंद झाला खरा, पण हा पांढऱ्या पायाचा पांढरा पोषाख पाहून माझे डोळे पांढरे होण्याची वेळ आली !

**महा०**—तुम्हांला रे लग्न लावायला कोणी सांगितलें होतें ?

**गिर०**—काय हो रावसाहेब, आमच्यावर डोळे फाडून गुरगुरणारे हे दोघे सद्‌गृहस्थ कोण आहेत आणि हे कोणत्या अधिकारानं आम्हांला विचारीत आहेत ? हे सभ्य गृहस्थच आहेत कीं, सभ्य गृहस्थांचा पोषाख चढवून आमच्याशीं मारामारी करायला आलेले हे मवाली गुंड आहेत ?

**वैज०**— येनू माताडवीयो ननगे ? नानू मवाली गुंडवे ?

**राव०**— हां हा, वैजनाथराव, या वेळीं तरी यांना न समजणाऱ्या भाषेंत बोलूं नका ! असल्या वेळीं तुम्ही साधे शब्द उच्चारलेत, तरी यांना वाटायचं तुम्ही शिव्याच देत आहांत !

**गिर०**— आणि आमचे दशग्रंथी, वैदिक गोकर्णभटजी ' भट्टुर्गा ' काय ? कांहीं जिभेला आवराल कीं, नाहीं ? या भटजींच्या नखाची तरी सर तुम्हाला येईल का ?

**महा०**— पण तुम्ही हें लग्न कां लावलेंत ? या वधूवरांचीं आईबापें अजुनी मसणांत उलथलीं नाहींत ! यांच्या आज्ञेवांचूनच लग्न लावतां ?

**चंद्र०**—हें पाहा, महाबळेश्वर, आतां भलतं सलतं बोलूं नकोस बाबा ! मी पाया पडूं का तुझ्या ? हें पाहा, झालं आहे तें सारं चांगलंच झालं आहे.

**प्रया०**—(स्व.) मी रावसाहेबांच्या घरीं पोरीला न देण्याची प्रतिज्ञा केली होती, पण झालं तें बरं झालं, असं हिच्याप्रमाणं मलाही वाटूं लागलं आहे. (उ.) महाबळेश्वरमामा, हें पाहा इतका वेळ झालं तें झालं; आतां तरी तोंड आवरा.

**महा०**—आण्णा, प्रतिज्ञेचें स्मरण करा. या कानडी आप्पाच्या घरीं...

**चंद्र०**—हें काय रे महाबळेश्वर ? खबरदार असं बोलशील तर !

**प्रया०**—मामा, मी आतां माझ्या प्रतिज्ञेचं स्मरण न करितां तिला विसरून जात आहें !

**महा०**—( स्व. ) झालें, हे दोघेही खांब कोसळले !

**वैज०**–तुम्ही प्रयागपंताच्या पोरीचं लग्न लावलंत, तरी त्याबद्दल तुम्हाला आम्हाला विचारायचं कांहीं कारण नाहीं; पण आमच्या प्रभासपंतांचं लग्न लावायची तुम्हाला काय जरूरी ?

**कात्या०**–असं कसं ग बाई! आपलं वाटेल त्यानं वाटेल तें करायचं जळ्ळं! आई, तुला तरी हें कसं बरं वाटतं ?

**मणि०**–कात्यायनी, झाले इतके धिंडवडे पुष्कळ नाहीं का झाले ?

**गिर०**–अहो वैजनाथराव, आम्ही हें लग्न लावलंच नाहीं; लग्न लावलं आहे वधूवरांनीं एकमेकांनीं एकमेकांचं; आम्ही फक्त 'नांदा सौख्यभरें' म्हणून यांच्यावर मंगलाक्षता टाकल्या इतकंच. वराला वधू पसंत आहे; ला वर पसंत आहे. मग त्यांच्या लग्नांत विघ्न उपस्थित करण्याचा आम्हांला ाय अधिकार आहे ? त्यांच्या लग्नाच्या निमित्तानं चार दिवस आडवा हात मारणं आणि सूत्रधार नटीचे पोषाख अंगावर र त्तीच्या उजेडांत आणि नक्षत्रमाळांच्या प्रभावळींत आम्हांला तुम्हांला काय कामगिरी आहे ?

बोललांत, गिरनारपंत तुम्ही. वधूवरं अज्ञान असतील, तर ाच्या बाबतींत आईबापांचा अधिकार चालेल; पण सज्ञान रांच्या विरुद्ध जाऊन कसं भागेल ?

ातां कसं बरं बोलायचं झालं तें! कशी दिसते आहे पाहा ारायणासारखी!

नुसतीं मंगलाष्टकं म्हटलीं, म्हणजे कांहीं शास्त्रानं लग्न झालं नाहीं. अजुनीसुद्धां हें लग्न मोडतां येईल.

**ाव०**— छे छे, पोरांच्या मनांत जर एकमेकांशीं लग्न करायचं आहे, तर लग्न कसलं मोडतां वैजनाथराव!

**वैज०**— मग तुम्ही यांचं लग्न कायम करणार कीं काय ?

**राव०**— मग यांत संशय आहे कीं काय ?

**वैज०**— तर मग मी माझ्या बायकोला घेऊन जातों माझ्या गांवाला! पुन्हां हिचं नख दृष्टीला पडणार नाहीं आणि मीही पण येणार नाहीं, हें ध्यानांत धरा! नडि ये नडी!

**कात्या०**— ( हळूच. ) असं काय करतां तें ? सारीं चांगुलपणा घेत आहेत; आपणच काय वाईटपणा घ्यायचा जळ्ळा तो !

**वैज०**—(हळूच.) तें खरं, पण आतां इथं राहूं कसा ? मी रागावून जातों, तूं मला पाया पडून परत आण ! ( मोठ्यानें. ) काय तुला माझ्याबरोबर यायचं नाहीं ? हा चाललों बघ मी !

**कात्या०**— आई, हे निघाले बघ. तूं तरी यांना चार शब्द सांग.

**मणि०**- असं काय करतां जांवईबुवा ? शेवटीं गोड तें सारंच गोड नाहीं का ?

**कात्या०**— मी पाय धरतें, आपण असा राग करूं नये !

**वैज०**— बरं बरं, तुम्ही इतकी विनवणी करतां, तर मीही प्रतिज्ञा रद्द करतों !

**गिर०**— प्रभासराव, मीनाक्षीताई, आतां, तुमच्या मात्यापित्यांना नमस्कार करून त्यांचा मंगलाशीर्वाद घ्या बरं.

**प्रभा०**— आप्पा, आपल्या मनाविरुद्ध कार्य साधलं, याबद्दल आपण मला क्षमा करा ! ( दोघे नमस्कार करतात. )

**राव०**—दीर्घायुष्यमस्तु !–अष्टपुत्रा सौभाग्यवती भव !–बाळांनो ! शेवटीं तुम्हीच शाहाणे ठरलांत !

**मणि०**— बाळा, तुझा मार्ग मला आवडला बरं !

**मीना०**— आण्णा, मी तुमची अनंत अपराधी आहें. (दोघे नम. क.)

**प्रया०**– दीर्घायुष्यमस्तु !– अष्टपुत्रा सौभाग्यवती भव !--बाळे, आम्ही ठरविलें होतें, त्याप्रमाणेंच तूं केलेंस ना ! चुकलेल्या मुलांना मार्गावर आणणारीं जशीं आईबापें हवींत, त्याप्रमाणें चुकलेल्या आईबापांनाही ताळ्यावर आणणारीं मुलें हवींत !

**चंद्र०** -छान केलंस हं बाळे.

**प्रया०**-रावसाहेब, झाल्या त्या गोष्टी विसरा आणि आम्हांला क्षमा करा. मुलं शाबूद सापडलीं यांतच सर्व आलें !

**राव०**–तुम्हीही आम्हांला क्षमा करा. आम्हीही कांहीं तुमचे कमी वाभाडे काढले नाहींत.

**महा०**–आम्हांलाही सर्व मंडळी क्षमा करा.

**वैज॰**--( स्व. ) नावादरू इद्रळ्ळ-कूड बेकू! ( उ. ) आम्हालाही क्षमा करा!

**प्रया॰**--आजचं हें देशस्थ कोंकणस्थांच्या पोटजातीचं एकीकरण समा-जाला मार्गदर्शक होवो.

**राव॰**--तरुणपिढीनं जोडलेलं हें कानडीमराठीचं प्रेम असंच उत्तरोत्तर वृद्धिंगत होतो!

**कात्या॰**—सारं झालं जळ्ळं, पण दादावर अक्षता टाकायला मिळाल्या नाहींत!

**गिर॰**--तें का? हा पहा दुसरा मुहूर्त सुरू झाला; म्हणा पुन्हां मंगलाष्टकं!

**राव॰**–होय का? तर मग गोकर्णभटजी करा पुन्हां सुरू. वाजवा रे वाजवा!

(मंगलाष्टकें सुरू होतात; वाजंत्री वाजत असतां पडदा पडतो.)



समाप्त.